


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] एप्रिल १९६१ [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें
अंक सातवा

एप्रिल
१९६१

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ ... सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४-०-० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६-०-० |
| (३) धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५-०-० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०-०-० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५-०-० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६-०-० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५-०-० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६-०-० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २-८-० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३-०-० |
| (११) चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... | | ३-०-० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २-८-० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६-०-० |

# सार-संकलन

## तरण्या मतांवर भाष्य

जॉन वेन प्रभृति लेखकमंडळी पुढल्या अंकांत ह्या अंकांत व्यक्त झालेल्या कांहीं समस्यांवर आपले विचार मांडतील, असें वचन The Twentieth Century मासिकाच्या संपादकांनीं नोव्हेंबर १९६०च्या अंकांत दिलें होतें. तें त्यांनीं पाळलें आहे आणि डिसेंबरच्या अंकांत फिलिप टॉइन्बी, जॉन वेन नि कॉलिन मॅकिनिस् या तिघांनीं आपापले विचार सांगितले आहेत. फिलिप टॉइन्बी यांनीं Twentieth Centuryच्या प्रश्नपत्रिकेला आपण तरुण असतांना कशीं उत्तरें दिलीं असतीं, ह्या एकाच मुद्द्याभोंवतीं बाकीचें सारें गुंफलें आहे. Twentieth Centuryच्या संपादकांनीं आपल्याला कांहीं लिहून देण्याची विनंति केली, एक कामगिरी आपल्यावर सोंपवली, याचें जॉन वेन यांना कांहींच वाटत नाहीं. तसें ते उघडपणें आरंभींच सांगून टाकतात. त्यांनीं मात्र थोडक्यांत का होईना पण नोव्हेंबरच्या अंकांतील एकूण सर्व लेखांचा विचार केला आहे. तिसरे कॉलिन मॅकिनिस– त्यांनीं फक्त संपादकांना एक पत्र पाठवलें आहे– तें मात्र Dear Bernard ह्या मायन्यानें सुरू होतें. आजच्या नि मागच्या पिढींतला फरक त्यांनीं स्पष्ट करायचा प्रयत्न केला आहे. आतां, हीं तिन्ही नांवें इंग्रजी साहित्यांतील मान्यवर नांवें आहेत. आणि ' तरण्या मतां 'चें संकलन ' नवभारत 'च्या फेब्रुवारी अंकांत दिलें होतें. तेव्हां ह्या तिघांची प्रतिक्रियाहि येथें देण्यांत येत आहे.

### फिलिप टॉइन्बी

प्रथमतः १९३७ सालीं आपण ऑक्सफर्डला होतों तेव्हां प्रश्नपत्रिकेंतील प्रश्नांचीं उत्तरें आपण कशीं दिलीं असतीं, हें दाखवण्याकरतां श्री. टॉइन्बी यांनीं सरळ एक उत्तरपत्रिकाच लिहिली आहे. त्यांत १९३७ सालच्या कडवा कम्युनिस्ट असलेल्या एका विद्यार्थ्याचे त्या काळच्या परिस्थितीवरचे विचार आले आहेत. त्यानंतर ते लिहितात :

' १९६० सालच्या तरण्या उत्तरांत असामान्य अभावानें झळकलेल्या गुणाशीं विरोधीभाव दाखवण्याच्या भरांत मीं माझा भाबडेपणा वाढवून तर सांगितला नाहीं ना ? कदाचित् मीं तसें केलें असेल. कारण सांप्रत आपण अधिक शहाणे बनलों आहोंत असें दाखवण्याकरतां भूतकाळांतल्या आपल्याशीं विश्वासघातकता करणें नेहमीच चालू असतें. परंतु गेल्या महिन्याच्या Twentieth Century च्या अंकानें माझ्यावर प्रमुख छाप पाडली असेल तर ती ह्याची, कीं त्यांत आत्यंतिक सुसंबद्धता, भेदक आत्मज्ञान आणि संशयवाद नसलेला भ्रमनिरास. आमच्या काळीं आम्ही फार भाबडे होतों. आणि खूपच अधिक affected होतों. आमचे सौंदर्यपूजक व्रात्य असतात आणि आमचे राजकारणी लोक कळकळीचे व स्वतःचा बडेजाव मिरवणारे असतात.

' ह्या साऱ्या अंकालाच आलेला sober निकडीचा सूर हायड्रोजन बॉंबमुळें तर आला नाहीं ? ' तिसावं वर्ष पाहण्याची तुमची अपेक्षा आहे ? नाहीं, पण मला आशा आहे. ' यापेक्षां चांगल्या किंवा वाईट रीतीनें तें सांगतां आलें नसतें. आणि तरी आम्ही नजिकच्या काळांत येऊं घातलेल्या युद्धाच्या छायेंत जगत होतो, मी ऑक्सफर्ड सोडलें, तेव्हां ऑश्विट्झ् अवघें पांच वर्षांच्या अंतरावर होतें, माझे कित्येक मित्र स्पेनमध्यें लढत होते, आणि तरी आमच्याकरतां तें वातावरण कत्तलीपूर्वीच्या चैनीच्या दिवसासारखं होतं. राजकारण






उत्तेजित करणारें होतें आणि आपलें चित्त थरारून जावें म्हणून आम्हींच निर्माण केलेला एक राक्षस होता. आम्हाला– म्हणजे मध्यम व वरच्या वर्गातल्या डाव्या फळीचे सदस्य यांना– फॅसिझमबद्दल मनस्वी द्वेष वाटत होता, बेकारांबद्दल प्रामाणिक करुणा वाटायची. आजच्या तरुणांना वाटतें तसें आम्ही हस्तीदंती मनोऱ्यांत रहात नव्हतों. आम्ही 'जनताभिमुख झालों', जसे १८६० सालीं तरुण रशियन बुद्धिमंत जनतेकडे गेले होते. इंग्लंडमध्यें व इतरत्र होणाऱ्या जनतेच्या विराट् निदर्शनांत आम्ही भाग घेतला. आमच्या राजकारणाकरतां आम्ही कष्ट वेंचले, आमच्यापैकीं कांहींजण त्याकरतां लढले, आणि कांहींनीं तर प्राणहि दिले. परंतु आमची स्थिति निदान द्वावस्थेंत होती, बरी होण्याजोगी-करण्याजोगी, प्रेरक होती. उध्वस्त किंवा फॅसिस्ट जगाला शरणागति देण्यापेक्षां, आम्हांला खरोखरच असें वाटत होतें कीं, एक जागतिक क्रांति घडून येईल, आणि त्यानंतर आपण शाश्वत प्रेमाच्या सान्निध्यांत राहूं, आणि ह्यावर आम्ही विश्वास ठेवत आलों, रशियांत चाललेल्या शुद्धीकरणाच्या मोहिमांचा प्रचंड धक्का देणारा पुरावा समोर असून विश्वास ठेवत आलों.

'होणार म्हणून आम्हीं पूर्वींच भाकित केलेल्या युद्धांत माझे खूप मित्र मारले गेले, परंतु तरी 'आपल्याला तिसावं वर्ष पाहण्याची अपेक्षा नाहीं' असें उत्तर देणें आम्ही असह्य भावुकता मानली असती. आज एखाद्या तरुणानें किंवा तरुणीनें 'आपल्याला उदंड आयुष्य, आणि मुळींच चिंता न करतां भविष्यकाळाकरतां कांहीं योजना आपण आंखूं शकतों,' असें उत्तर दिलें, तर ती एकतर भावुकता असेल किंवा आपण होऊन डोळयावर पट्टी बांधण्याचा तो मूर्खपणा तरी असेल.

'ह्या चर्चेंत आणखी एक गोष्ट ठळकपणें दिसून येते. ती अशी कीं, वयांमधील युद्धांत तहाची घोषणा गेली केली आहे–कदाचित् शांतता टिकवण्याच्या विचारावर दोन्ही बाजूनें शिक्कामोर्तबहि झालें असेल. 'मोठयांनी त्यांना जसें घडवलें, तसें आजचे तरुण बनले आहेत' होय. अन् त्यांना परत त्यांच्या मोठ्यांनीं जसें घडवलं, तसें ते बनले; अन् मग असें मागें–मागें जात जात शेवटीं गरीब बिचारे ॲडॅम नि ईव्ह– त्या दोघांवरच सगळी जबाबदारी आहे. ह्या असल्या जबाबदाऱ्या नेहमी मागें टाकण्यानें कांहीं विशेष मदत आपल्याला झाली आहेसें मला वाटत नाहीं. कधीं तरी आपल्याला आपल्या स्वतःच्या जबाबदारीची कल्पना मान्य करावीच लागते; अन् हें आपण जितकें लवकर करूं, तितकें अधिक बरें. कारण शेवटीं एक पिढी म्हणजे पुष्कळ निरनिराळया तऱ्हांचीं बरीचशीं एकाच वेळीं जन्माला आलेलीं माणसं.

'१९१४ किंवा निदान १९१६ सालच्या तरुणांपासून पिढयांच्या हिशेबानें विचार करण्याची आधुनिक संवय प्रचारांत आली. त्यांच्या कटुता असण्याला कारण होतें; जुन्या पिढयांनीं युद्धें उकरून काढलीं नि आतां निर्दोष तरुणांना त्यांत मरावें लागत आहे, असें म्हणणें सोपें होतें. पण तीं तरुण माणसें त्या शतकाच्या वळणावर जर मोठींच असतीं तर त्यांनीं ह्यापेक्षां वेगळें व चांगलें कांहीतरी केलें असतें असें कोण म्हणेल? असें म्हणण्यांत कांहीं अर्थ आहे, असा दावा तरी कोण करूं शकेल? कारण आपण सर्वचजण इतर अनेक गोष्टींप्रमाणें, आपल्या वर्तमानकाळानें बनवलेले आहोंत. आणि स्वतःला वेगळया काळांत बघूं जाणें वा तशी कल्पना करणें, ही एक अतिशय विरोधी गोष्ट आहे. आपण सर्वच जण इतक्या उघडपणें एकाच बोटींतून प्रवास करत आहोंत, कीं ठार आंधळया किंवा ठार अडाणी माणसाची सुद्धां आतां कींवच अधिक करावी लागेल–किंवा हेवा–पण त्यांना चार शिव्या नाहीं हसडतां येणार.










'शेवटचा मुद्दा : कदाचित् गौण वाटेल, परंतु मला स्वतःला तो अतिशय व्यावसायिक महत्त्वाचा वाटला. आपल्या आवडत्या, आपल्या भावना दुसऱ्या कोणाहि पेक्षां अधिक समग्रतेनें व्यक्त करणाऱ्या, व आपल्याला सर्वांत अधिक प्रभावित केलेल्या चाळीस नांवांपैकीं निदान सतरा नांवें १९३७ सालीं सुद्धां देतां आलीं असतीं. यांतील ब्रेख्ट्, कामू, कोएस्लर्, वेन, ॲमिस, मॅकार्थी, द् नोव्हा, वेहान, मॅकिनिस्, सॅलिंजर, नॅब्रोकोव्ह, कॅरी, ॲंगस विल्सन, विल्यम्स्, टॉल्कियन्, ड्युरेल् ( टेरी सदर्नला मी वगळतों आहे-कारण, खरें सांगायचें तर तो कोण आहे, हें मला माहित नाहीं. )-या सोळा लेखकांनीं माझ्या पिढींतल्या लोकांवरहि प्रभाव गाजवला नि अजून आजच्या तरुण पिढीला ते प्रभावित करत आहेत. अन् त्यांच्यापैकीं तीन, माझ्या माहितीप्रमाणें वारलेले आहेत; आठ जणांनीं चाळीशी ओलांडून पन्नाशीकडे पाय उचलले आहेत. आता उरले वेन्, ॲमिस्, बेहान्, मॅकिनिस् अन् सॅलिंजर अन् शेवटच्या दोघांना मी वयाच्या संशयाचा फायदा देतों. पण यांपैकीं एकहि पस्तिशीच्या खालचा नाहीं. अन्-अरेरे-यांच्या पैकीं एकहि जण माझ्या गालावर लाली आणूं शकत नाहीं, जसं माझीं वडीलधारीं माणसं आहेत किंवा इशरवूड, किंवा फेअरबँक किंवा हक्सलेच्याहि उल्लेखानं स्वतःला लालीलाल करायचीं.

'पण ह्याचा अर्थ इतकाच कीं दुसऱ्या नि तिसऱ्या दशकाच्या सुरवातीच्या क्रांतीनंतर वाङ्मयांत क्रांतीच झालेली नाहीं.'

## जॉन् वेन्

"तरणीं मतें" विशेषांकाविषयींची माझी प्रतिक्रिया काय आहे, हें जाणून घ्यायची संपादकांना इच्छा आहे मी दिक्कत बाळगतों त्या कामगिऱ्यांपैकीं ही नव्हे, पण ओकच्या जुन्या सेटलच्या पलीकडून तुम्हीं मला मदत केलीत; माझा बहिऱ्याचा कान शोधून दिलात, माझ्या भोंवतीं रज्जू लपेटलेत अन् मग माझ्या शाबूत कानाच्या मागें बसलांत (मात्र जास्ती बोलणं तुम्हीच कराल असं मात्र नव्हे), तर मग आपल्याला काय बरळतां येईल तें मी पाहीन. तंबाखूचा गोळा पलीकडल्या गालांत ढकलेपर्यंत जरा थांबा. पूर्वीं ह्याला तीस शिलिंग पडायचे, आतां दिवस कठीण आलेत.

'बरं तर, आतां पहिल्यांदा, ह्या कामाची मला दिक्कत वाटत नाहीं असं मी कां म्हणतों ? हां, त्याचं असं आहे, कीं विशिष्ट थरांच्यावर उभारलेले ढोबळ सामाजिक आडाखे मला नेहमीं अस्वस्थ करतात. ('तरुणां'ना अमुक वाटत, म्हातारीं माणसं' तमुक करतात). माझं स्वतःचं निरीक्षण मला असं शिकवतं, कीं माणसं एकमेकांपेक्षां वेगळीं असतात, कपड्यांच्या न् करमणुकीच्या फॅशन्सकडे तुम्ही बोट दाखवूं शकाल, अन् थोड्या कमी ठामपणें तुम्हांला राजकीय न् सामाजिक दृष्टिकोनांकडेसुद्धां बोट दाखवतां येईल, अन् तुम्ही म्हणाल, कीं अमक्या-अमक्या किंवा तमक्या-तमक्या पिढींत ह्या गोष्टींचा खूप प्रसार होता; पण ह्यापेक्षां जास्ती कांहींच तुम्हाला करतां यायचं नाहीं. अन् केलंत एवढंसुद्धां खरं म्हणजे करण्याजोगं आहे का ? मी असं विचारतों, कारण मला स्वतःला आपण अमक्या एका वयोगटांतले आहोंत असं कधींच वाटलेलं नाहीं; मी जेव्हां पदवीपूर्व विद्यार्थी होतों, तेव्हां 'अर्थात् मला हें आवडतं, किंवा तें आवडत नाहीं, कारण माझी रुचि एका पदवीपूर्व विद्यार्थ्याची आहे', असले विचार करतांना मी स्वतःला कधींच सांपडलों नाहीं; मला फक्त नेहमीं 'माझ्या' सारखंच वाटत गेलं. अन् मी जेव्हां विशी ओलांडली न् सुरवातीच्या कांहीं वर्षांतच मिळवता झालों ( एका provincial विद्यापीठांत वर्षाला चारशें पौंडावर शिकवायला लागलों ), तेव्हां आपण P U Lsच्या वृत्तींचं

प्रतिनिधित्व करतोंय् असं माझं मला कधींच वाटलं नाहीं. मी त्याच्याबद्दल विचार केला, असंसुद्धां मला वाटत नाहीं. मी मी होतों अन् दुसरीं माणसं दुसरीं माणसं होतीं.

'अर्थात् मी वेगळ्या काळांतला माणूस आहें. — म्हणजे माझी सुरवात वेगळ्या काळांत झाली. १९४३ सालीं—ज्या वर्षीं मीं सामान्यतः सैन्यांत भरती झालों असतों—नालायक म्हणून मला सैन्यांत नाकारलं. अन् वर्षाचा उरलेला काळ मीं ऑक्स-फर्डला काढला. त्या वेळपर्यंत खूपच माणसं सैन्यांतनं अपात्र ठरून बाहेर पडलीं होतीं, अन् विद्यापीठांत भरती होणं त्यांना सोपं होतं, त्यामुळें माझे पुष्कळसे मित्र ह्या मोडलेल्या भूतपूर्व—लढवय्यांतलेच होते. त्यांचा कोणताच 'वयोगट' बनत नव्हता : कांहीं माझ्या वयाचे होते, कांहीं माझ्यापेक्षां मोठे होते. अन् त्यांचं गतायुष्य भलतंच वेगवेगळं होतं. आम्हीं 'पदवीपूर्व विद्यार्थ्यां'सारखा किंवा 'तरुणां' सारखा विचार केला पाहिजे, त्यांच्यासारखंच आम्हांला वाटलं पाहिजे, असं कुणीं आम्हांला सांगितलंच नाहीं, अन् कुणीं सांगितलं असतं तर आम्हीं तें ऐकलं नसतं.

'दहा वर्षांपूर्वीं किंवा पांच वर्षं नंतर, मीं कुठल्या तरी एका क्लबाचं मेंबर व्हायला हवं होतं, अशी माझी समजूत आहे—माझ्याच वयाच्या किंवा माझ्यासारखे अनुभव असलेल्या लोकांनीं बनवलेल्या क्लबाचं. अर्थात् तिसऱ्या दशकांतल्या तरुण बुद्धि-वाद्यांजवळ वृत्तींचा एक तैय्यार संच होता; हा संच आज इतक्या अंतरावरनं पाहिला तर आज-च्या बिट्निकच्या संचाच्या मानानं कमी ठरीव दर्जाचे नव्हते. अन् बिट्निक म्हणजे एलिझबेथ—कालीन 'Malcontent'ची निव्वळ एक अमे-रिकन आवृत्ति. अन् लोक म्हणतात, कीं आजची तरुण माणसं हीं हुबेहूब गणवेशासारखीं आहेत. पण, कां कोण जाणें, मला हें पटत नाहीं, —पटूं शकत नाहीं. तुम्ही याला कल्पनाशक्तीचा तोकडेपणा म्हणा—तसल्या प्रकारच्या गट-जीवनाचा अनुभव कधीं न घेतल्यामुळें, दुसऱ्या माणसांत तें आहे अशी कल्पना मी करूं शकत नाहीं—पण हा तोकडेपणा आहेसं मला वाटत नाहीं. कारत कांहीं झालं तरी 'तरण्या मतां'त लिहिणाऱ्या लोकांत अशी कांहीं चिक्कार एकरूपता ( uniformity ) नाहीं, अन् तरी ते सगळे लोक ऑक्सफर्ड अन् केंब्रिजमधले आहेत. तें जास्ती कठीण गेलं असतं हें मला माहित आहे, पण Redbrick विद्यार्थ्यां-कडनं आपण जास्ती लेखनसहकार्य मिळवूं शकलों नसतो का ? किंवा फॅक्टऱ्यांत काम करणाऱ्या तरुणांच्या मुलाखती, वगैरे वगैरे ? ( मुलाखती—म्हणजे त्यांना जर आपले विचार कागदावर उतरवणं अशक्य वाटत असेल तर. )

'म्हणून मला मुद्देसूद बोलणं भाग आहे : कोणते लेखक सार्थ बोलतायत् (talking sense) अन् कोणते तसं करत नाहीं आहेत—असं मला वाटतं—हें सांगणं भाग आहे. ते सांगत असलेल्या चिक्कारच मला अगदीं भांबावून सोडणाऱ्या वाटतात, पण लोक भांबावून सोडणारेच असतात, मग ते तरुण असोत किंवा नसोत. उदाहरणार्थ, एक माणूस म्हणतो, कीं मी Methodist आहे, अन् आधींच एक ओळ सोडून त्यानं म्हटलेलं असतं, कीं आपले कपडे निवडण्यांत मी नेहमीं आठवडे न् आठवडे घालवतों. आपले कपडे निवडण्यांत कित्येक आठवडे घालवणारा Metho-dist मला अद्याप भेटलेला नाहीं; ह्या दोन्ही कल्पना एकाच वेळीं स्पष्टपणें पाहणं मला जड जातं; मला वाटत होतं, ते सगळे सारखेच गंजलेल्या काळ्या रंगाचे कपडे वापरतात. तोच माणूस म्हणतो, किं जर संधी मिळाली तर आपण राजकारणांत जाऊं, तीन पक्षांपैकीं कोणत्याहि पक्षांत गेलं तरी त्याला चालेल. म्हणजे त्या सगळ्यांचं

Methodism शीं ठीक जुळतंसं दिसतं. मग हा माणूस जर उद्योगधंद्यांत शिरला तर तिसाव्या वर्षीं वर्षाकांठीं तीस हजार पौंड मिळवण्याची त्याची अपेक्षा आहे, हें वाचून आश्चर्य वाटत नाहीं. अर्थात् एक गोष्ट आपल्याला गृहित धरली पाहिजे, कीं दर आठवड्याला समाजाकडून साठ पौंडांची मागणी करण्याइतकी पात्रता त्याच्याजवळ आहे, अन् शिवाय 'सामाजिकदृष्ट्या अपायकारक' असणारी नोकरी तो करणार नाहीं. माझा अंदाज असा आहे, कीं तो राजकारणांत शिरेल— 'आत्यंतिक oligopoly चे परिणाम सुधारण्याची आशा बाळगून एका साबण-कंपनींत' थोडा काळ घालवल्यानंतर मग. हा विशिष्ट माणूस कोणत्या वर्गांत बसतो ? अर्थात्, कोणत्याच नाहीं; तो फक्त शक्य तितक्या प्रामाणिकपणें प्रश्नांचीं उत्तरं देतोय्, अन् सुसंगतीची चिंता करत नाहीं एवढीच त्याची जमेची बाजू. पण असल्या उत्तरांचं आपण चिकित्सक बुद्धीनं विश्लेषण करावं, अन् तरुणांबद्दलचा पुरावा म्हणून त्यांचा उपयोग करावा हें बरं नाहीं.

'सबंध उत्तरपत्रिकेंत निष्पन्न होणारी जवळजवळ एकुलती एक गोष्ट म्हणजे-हायड्रोजन बाँबबद्दलच्या काळजीनं प्रत्येकाला ग्रासलंय् (आश्चर्य!) अन् लग्नाआधीं (ऐवजीं नव्हे) लैंगिक अनुभव असायला बहुतेकांची हरकत नाहीं; बहुतेकांना घरदार थाटून संततिला जन्म द्यायचाय्-हें अगदीं स्वाभाविक आहे; मृत्यूच्या झुलत्या सावलीखालीं दबून वावरणाऱ्या समाजांत तुम्ही रहात असाल, तर आपल्या जातीचा प्रसार करणं हें तुमचं उत्तर असणार, जीवनावरच्या तुमच्या श्रद्धेचं तें सर्वांत प्रभावी assertion आहे. मोठीं होईतोंपर्यंत मुलं जगतील कीं नाहीं, याची चिंता कोण वहात बसतो ? तुम्ही जर जगांत एक मूल आणलंत, न् त्याला दोन तीन-पाच वर्षं जगांत सुखानं जगूं दिलंत, तर आनंद वाटण्याजोगं कांहींतरी तुम्ही नक्कीच केलेलं आहे.

'संपादकांनीं बरोबर हेरल्याप्रमाणें, ह्या अंकांत लिहिणाऱ्या लेखकांना साम्यवाद ही एक मेलेली समस्या वाटते. (तरीसुद्धां लोकांशीं मैत्री करण्यापूर्वी त्यांच्यांत 'विशुद्ध ध्येयनिष्ठा' हवी असा दावा करणाऱ्या भल्या गृहस्थानं आपलं नांव न् पत्ता पॉलिटब्युरोला पाठवून द्यावींत). पण मला खटकली असेल तर एकच गोष्ट— ती म्हणजे, जागतिक साम्यवाद हा एक भयंकर धोका आहे, असं त्यांच्यापैकीं कुणालाच वाटत नाहीं. पन्नास वर्षांपूर्वीं सुमारें वीस साहाय्यकांनिशीं लेनिननं साम्यवादी पक्ष सुरू केला; आज आठ हजार लक्ष माणसं (खरंच ?) साम्यवादी राजवटीखालीं आहेत. मोजणीच्या कोणत्याहि मापानं ही गति नक्कीच जलद आहे. तरुणांना ह्याची अजिबात काळजी वाटत नाहीं ? कदाचित् नसेल वाटत; कारण एक गोष्ट नक्की आहे— ते आशीर्वाद जमेला धरत नाहींत. भर राजकीय अत्याचारांखालचं जीवन त्यांच्यापैकीं कुणींच थोडंसंसुद्धां अनुभवलेलं नाहीं; त्यांना जर सरकार आवडत नसेल तर तें उडवून लावूं शकतात, छापील मार्गानं किंवा viva voce, किंवा आणखी एक पर्याय आहे— ते त्याच्याकडे दुर्लक्ष करून आपलं आयुष्य जगूं शकतात. सांघिक शय्यागारांत राहण्याची, शिक्षण म्हणून सरकारी प्रचार पाठ करण्याची, स्थानिक सिमेंट फॅक्टरींत स्वयंसेवक म्हणून काम करायला कवाइतीनं जाण्याची अवस्था त्यांच्यावर ओढवली तर ते काय म्हणतील, मला माहित नाहीं. पण जाणून घ्यायला मला आवडेल.

"साम्यवाद्यांचा विश्वास आहे (अधिकृतपणें, पण माझ्या मतें पूर्णतः प्रामाणिकपणें), कीं आणखी दोन पिढ्यांत जग साम्यवादी होऊन जाईल. हें 'तरुणां' ना पटतं का ? कीं त्यांना त्याची चिंताच नाहीं ? कीं त्यांच्या तें लक्षांतच आलेलें नाहीं ? हा माझा प्रश्न आहे."







## कॉलिन् मॅकिनिस्

'मी कांहीं आतां तरुण नसल्यामुळें, मला तरुणांकडून शिकण्याची–त्यांना कांहीं सांगण्याची नव्हे– इच्छा आहे. मात्र आश्चर्यकारक वाटणारी गोष्ट म्हणजे, माझ्या आणि त्यांच्या वयांत खूप फरक असला व माझें वय झालें असलें, तरी तरुण लेखकांनीं निवडलेले विषय आणि त्याचा त्यांनीं केलेला कल्पनाविस्तार, ह्यांत मला रस वाटतो. पूर्वीच्या कोणत्याहि पिढीनें–कल्पनांना पोसण्याकरतां वस्तुस्थिति गोळा करण्यास खूप वर्षे लाभलीं असूनहि –घेतले नसतील इतके कष्ट घेऊन व अधिक परिणामकारकतेनें तरुण पिढी विचार करीत आहे.'

## चीनमधील माओचें बूड

'पाश्चिमात्य राष्ट्रांनीं आतां हें गृहीत धरल्यासारखेंच आहे कीं रशिया आणि चीन हीं दोन्ही राष्ट्रें भक्कम पायावर उभीं असून युरोप आणि आशियातील इतर राष्ट्रांवर हीं राष्ट्रें अनेक वर्षे प्रभाव पाडूं शकतील. आणि हेंच गृहीत धरणें त्यांच्या दृष्टीनें सोयिस्कर आहे. कारण ह्या सर्वंकष सत्तांचा अधःपात अटळ आहे असें पूर्वी अनेकवेळां केलेलें मनोराज्य अनेकवेळां धुळीला मिळालेलें आहे. परंतु ह्या मनोराज्याबाबत हीं पाश्चिमात्य राष्ट्रें आतां इतकीं निराश झालेलीं आहेत कीं कम्युनिस्ट राष्ट्रांतील सर्वंकष सत्ता कधीकाळीं ढासळून पडूं शकेल याची शक्यताहि त्यांना वाटत नाहीं.

'आज मितीस रशियन राजवट चिनी राजवटीपेक्षां अनेक पटींनी बळकट आहे. औद्योगिक प्रगतिमुळें रशियांतील नागरिकांचें जीवनमान उंचावलें आहे. स्फुटनिक आणि ल्युनिक हे त्यांचे राष्ट्रीय मानबिंदू होऊन बसलेले आहेत. लष्करी दृष्ट्या अण्वस्त्रें आणि inter continental missilesच्या योगानें रशिया हा आज जगांतील दोन बड्या राष्ट्रांपैकीं एक होऊन बसलेला आहे.

ह्याउलट औद्योगिक दृष्ट्या चीन अजूनहि मागासलेलाच आहे. आणि ह्या क्षेत्रांत चीन जरी जलद प्रगति करीत असला तरीदेखील यासाठीं तेथील जनतेच्या नशीबीं मात्र अत्यंत हालअपेष्टा, अतिश्रम, याखेरीज दुसरें कांहींच आलेलें नाहीं. चीनजवळ एखादें अण्वस्त्रहि नाहीं किंवा जगाचे डोळे दिपवणारे चंद्रबाणहि नाहींत. जागतिक महायुद्ध झाल्यास संरक्षणासाठीं चीनला रशियाच्याच तोंडाकडे बघावें लागणार आहे आणि शांततेच्या काळांत देखील आर्थिक मदतीसाठीं त्याला रशियावरच अवलंबून रहावें लागत आहे. पोलंड आणि हंगेरी प्रमाणें चीन हें कांहीं रशियाचें अंकित राष्ट्र नाहीं. त्यामुळें तर ही परिस्थिति जास्तच लाजिरवाणी झाली आहे.

'लोकसंख्येच्या दृष्टीनें आपण जगांतील सर्वांत मोठें राष्ट्र आहोंत ह्या कल्पनेनें चीनला पछाडलेलें आहे आणि जगांतील बलाढ्य राष्ट्रांपैकीं एक बनण्याची आकांक्षा तो मनांत धरून आहे. कम्युनिस्ट पार्टी आणि माओ त्से तुंग यांच्या नेतृत्वाखालीं तो आपलें पूर्ववैभव परत मिळविण्याची खटपट करीत आहे. आणि ह्या बाबतींत मास्कोसकट कोणाचीहि कोणतीहि वागणूक सहन करण्यास तो तयार नाहीं. दुर्दैव असें कीं, चीनला रशियावरच अत्यंत अवलंबून रहावें लागत आहे. ह्यामुळेंच राजकीय व आर्थिक दृष्ट्या चीनची प्रगति व्हावी तशी होत नाहीं.

'चीनमधील कम्युनिस्ट क्रांति आणि रशियांतील कम्युनिस्ट क्रांति यांत एक फार महत्त्वाचा फरक होता. रशियांतील बोल्शेविक नेतृत्वाचा मूलभूत दृष्टिकोन आंतरराष्ट्रीय होता. १९१७ च्या क्रांतीच्या वेळीं वर्गयुद्ध आणि नव्या समाजाविषयीच्या कल्पना ह्याच गोष्टी महत्त्वाच्या होत्या. रशिया हें राष्ट्र म्हणून नांवलौकिकास यावें ही प्रेरणा नव्हती. कारण १९१४ पासूनच झारचा








रशिया जगांतील बलाढ्य राष्ट्रांपैकीं एक होऊन बसला होता.

'चीनची गोष्टच वेगळी होती. सामाजिक क्रांतीच्या कल्पनेबरोबरच परराष्ट्रीय शत्रूंपासून चीनचें संरक्षण करण्याची कल्पनाहि जोडली गेली होती. विस्कळित झालेल्या चीनला साम्राज्य-विरोधाच्या पायावर एकसंध करावयाचें होतें. चीन-मधील बुद्धिवादी आणि मध्यमवर्गीयांवर ह्याच कल्पनांचा पगडा बसला आणि कम्युनिस्टांचें आर्थिक धोरण विशेष पसंत नसतांहि ते ह्या क्रान्ती-कडे खेचले गेले.

'कोमिंटांगच्या वर्चस्वाखालीं दबून गेलेल्या चिनी कम्युनिस्टांना हें वर्चस्व झुगारून देण्याची संधि १९३६ मध्यें जपानबरोबरील युद्धामुळें मिळाली. परंतु ह्या युद्धांत जपानचा अखेर पराभव झाल्या-नंतर जपानविरोधाची जागा तावडतोब अमेरिका-विरोधानें घेतली. आणि तें साहजिकच होतें. चिनी कम्युनिस्ट चळवळ साम्राज्यविरोधाच्या पायावरच उभी होती आणि १९४५ पासूनच्या सर्व प्रचारांत आशियाई लोकांना गुलाम करून टाकूं इच्छिणाऱ्या अमेरिकेवर चिनी कम्युनिस्टांचा मुख्य रोख होता. आणि ह्या साम्राज्यविरोधी घोषणांची अत्यंत जरूर आतांच चीनला सर्वांत जास्त भासत आहे. कारण चिनी जनतेला तादृश लभ्यांश कांहींहि न देतां राष्ट्रीय प्रगतिसाठीं त्याग आणि परिश्रम करण्या-साठीं चिनी कम्युनिस्ट आवाहन करीत आहेत.

' परंतु ह्या बाबतींत चीनला खटकणारी मुख्य गोष्ट म्हणजे त्याचे व रशियाचे आजचे संबंध. कोरियन युद्धांत रशियाची चीनला मदत झाली आणि अशा प्रसंगांत ती पुढेहि होईल यांतहि शंका नाहीं परंतु रशिया चीन दोस्तीच्या मर्यादा अलि-कडे विशेष स्पष्टपणें जाणवूं लागलेल्या आहेत. तात्त्विक भूमिकेवर रशियानें चीनचा फोर्मोसावरील हक्क मान्य केला आहे हें जरी खरें असलें तरी फोर्मोसावरील आक्रमणाला मदत करून युद्धाचें लचांड गळ्यांत घ्यायला रशिया तयार नाहीं. चिनी कम्युनिस्टांच्या दृष्टीनें विशेषतः परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतच उणा पडणारा रशियाचा पाठिंबा फारच तापदायक आहे.

' गेल्या कांहीं वर्षांत तर सोव्हिएट रशियाचा अमेरिका विरोध पूर्वीसारखाच ताठर आणि कणखर आहे किंवा काय याचीहि चीनला शंका येऊं लागली आहे. एखाद्या वाक्पटू विक्रेत्याला शोभेल अशा भाषेंत क्रुश्चेव्ह यांनीं अमेरिकन जनतेला भुलवलें त्यामुळें तर रशियन हालचालींचे निरीक्षक आणखीच संभ्रमांत पडले आहेत. परंतु एक गोष्ट मात्र निश्चित कीं निरीक्षक ह्या सोव्हिएट पुढाऱ्यानें अमेरिकन सरकारबरोबर असे कांहींतरी संबंध जोडले आहेत कीं ज्यायोगें पश्चिम युरोप आणि अमेरिका यांच्यांतील बंध ढिले पडावेत. रशिया व अमेरिका हीं दोन बडीं राष्ट्रें आज जगांतील दोन गटांचें नेतृत्व करीत आहेत त्या त्या गटांतील राष्ट्रांचे हितसंबंध आपल्या एकमेकांतील संबंधानें जर ह्या दोन बड्या राष्ट्रांचे नेते बिघडूं देणार नसतील तरच फक्त त्यांना आपापल्या गटांतील राष्ट्रांचा विश्वास आणि निष्ठा संपादन करतां येईल. प्रे. आयसेनहॉवर हे एक सन्माननीय सद्गृहस्थ होते आणि अमेरिकन गटांतील सर्व राष्ट्रांचा त्यांच्यावर संपूर्ण विश्वास होता. शिखरपरिषदेसंबंधीं होणाऱ्या सर्व वाटाघाटींबाबत आयसेनहॉवर इतर सर्व राष्ट्रांचा सल्ला मुद्दाम घेत असत. आणि इतकें असूनदेखील Camp David येथील क्रुश्चेव्ह यांच्या बरोबरील वाटाघाटींबाबत युरोपीय वर्तुळांत काळजीचें वातावरण निर्माण झालें होतेंच. परंतु रशियन गटाचा नेता आणि साम्राज्यवादी गटांचा नेता यांच्यांत होणाऱ्या खेळीमेळीच्या वाटा-घाटींमुळें माओ त्से तुंगच्या मनांत जें वादळ निर्माण झालें होतें तें लक्षांत घेतां युरोपीय वर्तुळांत



अनुक्रमणिका

उठलेलें हें काळजीचें वातावरण कांहींच नव्हे. वास्तविक पाहतां चीनचे तर साम्राज्यवादी राष्ट्रां-बरोबर साधे राजनैतिक संबंध देखील नव्हते. राजकीय पुढाऱ्यांतील परस्परांविषयीचा गाढ अविश्वास हें तर कम्युनिस्ट यंत्रणेचें एक प्रमुख अंगच आहे. सत्तेसंबंधी वैयक्तिक स्पर्धेंतहि पाश्चिमात्य राष्ट्रांत जे संयम पाळले जातात ते तर कम्युनिस्टांनीं केव्हांच बूर्झ्वा प्रथा म्हणून उडवून लावले आहेत. ह्या पठडींत वाढलेला कोणताहि राजकारणी आपल्या सहकाऱ्याचा विश्वासघात करतांना 'हें बरें नव्हे' असले विचार मनांत आणील हें संभवत नाहीं.

'क्रुश्चेव्हचें आजपर्यंतचें गतायुष्य तर अशा प्रकारच्या लबाडीनें इतकें भरलें आहे कीं आजपर्यंत चीनच्या इच्छा आकांक्षांसंबंधी रशियानें जरी नेहमीच सहानुभूतीचें धोरण स्वीकारलेलें असलें तरीदेखील शिखर परिषदेंतील वाटाघाटींमध्यें चीनच्या हितसंबंधांबाबत क्रुश्चेव्हवर कितपत विश्वास टाकावा याबाबत माओला शंका वाटणें अगदीं साहजिक आहे. गेलीं कांहीं वर्षें तर सोव्हिएट रशियाकडून चीनला अनादराचीच वागणूक मिळत आहे. विशेषतः हिंदुस्थान, इंडोनेशिया इत्यादि तटस्थ राष्ट्रांच्या बाबतींत तर हें विशेषच जाणवतें. आशियांतील राष्ट्रांचा पाठपुरावा करत त्यांना पाश्चिमात्य राष्ट्रांच्या राजकीय आधाड्यांपासून दूर ठेवण्यांत रशिया आणि चीन यांचे सारखेच हितसंबंध गुंतलेले आहेत. परंतु रशिया आज हिंदुस्थान आणि इंडोनेशिया यांजबरोबर जे संबंध प्रस्थापित पित करीत आहे त्यांनी चीन आणि रशिया यांच्या सामाजिक हितसंबंधांना धोका आणलेला आहे. चीनच्या हितसंबंधाचा बळी देऊन सुद्धां आपला प्रभाव आशियाई राष्ट्रांवर पाडण्याचे प्रयत्न रशियाकडून चाललेले आहेत. आणि चीनचे हिंदुस्थान व इंडोनेशिया यांजबरोबर राजकीय तटे सुरू झाल्यानंतर तर रशियाचे हे प्रयत्न कमी न होतां उलट वाढतच आहेत.

क्रुश्चेव्ह यांनीं तर गेल्या हिवाळ्यांत केलेल्या हिंदुस्थान आणि इंडोनेशियावरील दौऱ्यांत चीनविषयीं चकार शब्दहि न काढतां रशियाची विलक्षण बढाई मारण्याखेरीज कांहीच केलें नाहीं. आणि हिंदी व इंडोनेशियन मुत्सद्यांबरोबर चीनच्या बाजूनें वकिली करण्याचें त्यांनीं अगदी खाजगी चर्चांमध्यें टाळलें असा अंदाज आहे. त्यांनीं वारंवार अशा जाहीर सूचना केल्या कीं चीनबरोबरच हिंदुस्थान आणि इंडोनेशिया यांनीहि नजीकच्या शिखर परिषदेंत आशियाचे प्रतिनिधी म्हणून भाग घ्यावा. परंतु असें करतांना चीन स्वतःला जगांतील बड्या पांच राष्ट्रांपैकीं आपण एक आहोंत असा जो दावा करीत आहे त्याला बाध येत आहे हें क्रुश्चेव्हनें विचारांत घेतलें नाहीं. रशियन नेत्याची ही वर्तणूक चिनी कम्युनिस्टांना अर्थातच खपली नाहीं. आपलीं वर्तमानपत्रें आणि नभोवाणी यांवरील वृत्तांमधून त्यांनी क्रुश्चेव्हच्या दौऱ्याला कटाक्षानें वगळून टाकलें. परंतु ह्याउलट सबंध कम्युनिस्ट गटाचा पुढारी म्हणून जर क्रुश्चेव्हच्या ह्या गांठीभेटी घडल्या असत्या तर त्यासंबंधीच्या वृत्तानें रकानेच्या रकाने भरून निघाले असते.

'सोव्हिएट नेत्याची ही वागणूक केवळ अजाणतेपणानें घडली असेल असें म्हणतां येत नाहीं. इतर बिगर कम्युनिस्ट आशियाई राष्ट्रांच्या पंक्तीतच चीनचें स्थान आहे ह्याची चीनला चांगली समज देण्याचीच इच्छा या वागणुकीमागें आहे हें उघड आहे. चीनचें आशियांतील महत्त्व वाढूं देऊन त्याला जागतिक घडामोडींतील आपला भागीदार बनूं देण्याची रशियाची अजिबात इच्छा नाही. उलट या ड्रॅगनची नखें काढून टाकून ह्या धोकादायक शक्तीभोंवतीं आपल्या अति पूर्वेतील अंकित








राष्ट्रांचें वडें टाकावें आणि आपला प्रभाव चीनपेक्षां जास्त ठेवावा अशीच रशियाची आकांक्षा आहे.

'चीनला हें सर्व समजतें. परंतु रशियाप्रमाणें त्यांना इतर आशियाई राष्ट्रांना आर्थिक मदतहि देतां येत नाहीं किंवा तो आपल्या लष्करी सामर्थ्याचा त्यांच्यावर दबावहि टाकूं शकत नाहीं. सीमाप्रश्न आणि इतर राष्ट्रांतील चिनी रहिवाशी यांच्यावरून उद्भवलेल्या झगड्यांमुळे तर चीनला आतां ह्या राष्ट्रांशीं साधे राजनैतिक संबंध ठेवणेंहि कठीण होऊन बसलें आहे.

'आशियाई राष्ट्रांत चीनला महत्त्वाचें स्थान देण्यास रशिया तयार नाहीं याचें चीनला वैषम्य वाटतें आणि त्याचबरोबर रशिया-अमेरिका यांची एकजूट झाल्यास आपण एकटें पडूं ही भीतीहि वाटते. त्यामुळें आतां वैचारिक भूमिकेवरून मार्क्स-लेनिनवादाच्या भाषेंत रशियन नेतृत्वाला शह देण्याचा प्रयत्न चिनी कम्युनिस्ट करीत आहेत. रशिया आतां लेनिनची साम्राज्यवादाविषयीची शिकवणूक विसरून गेला आहे आणि अणुयुद्धांच्या भीतीमुळें युद्धाची अपरिहार्यताहि विसरून जाऊन प्रतिगामी "Revisionist" कल्पनांना तो बळी पडत आहे अशी टीका चिनी कम्युनिस्ट करीत आहेत. परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतीत क्रुश्चेव्हची शांतिपूर्ण सहावस्थानाची (Peaceful co-existence) भूमिका जर एक तात्पुरता डांवपेच नसेल तर भ्रामक आहे. क्रुश्चेव्हला अमेरिकन साम्राज्यवाद्यांनी बनवला आहे आणि आपली शिखर-मुत्सद्देगिरी त्यानें अशीच चालू ठेवली तर ते त्याला पुन्हा बनवतील अशी सूचनाहि ह्या टीकाकारांनीं देऊन ठेवली आहे.

ह्या प्रचारांतून दोन गोष्टी बाहेर पडल्या आहेत. एक तर रशियन कम्युनिस्ट पार्टी कॉंग्रेसचे निर्णय हे लोक जुमानीत नाहींत आणि चीनच्या संमतिशिवाय झालेल्या अमेरिकेबरोबरच्या कोणत्याहि संबंधांना ते विरोध करतात. चिनी कम्युनिस्ट उठसूट रशियाचा समाजवादी गटाचा पुढारी असा उल्लेख करतात तेव्हां त्यांच्या बोलण्यांत आणि वागण्यांत बरबर पाहतां विसंगति दिसते. परंतु रशिया जर इतर शत्रू राष्ट्रांविरुद्ध ह्या गटाचें नेतृत्व करण्यास सिद्ध असेल तरच हें नेतृत्व त्याला लाभेल ही त्यांतली मख्खी आहे. ह्याचाच अर्थ असा कीं सबंध जगाचें विभाजन एकमेकांशी कधीहि न जमणाऱ्या दोन गटांत झालेलें आहे. ज्या क्षणीं चिनी कम्युनिस्टांच्या मतें रशिया मार्क्स आणि लेनिन यांचा मार्ग सोडून देऊन साम्राज्यवादी शत्रूंबरोबर हातमिळवणी करेल त्याचक्षणीं त्याचें समाजवादी गटाचा पुढारी म्हणून अस्तित्व संपेल.

'रशियन धोरण कम्युनिस्ट ध्येयाचा विश्वासघात करणारें आहे हें सयुक्तिक रीतीनें मांडण्याचे परिणाम कांहींच होत नाहींत असें नाहीं. कारण सोव्हिएट कम्युनिस्ट पार्टींत देखील असे कांहीं मातबर लोक आहेत कीं जे आजच्या ह्या ढिलाईच्या धोरणाचे परिणाम काय होतील याबद्दल शंकाकुल आहेत. परंतु सर्वसाधारण धोरणाच्या बाबतींत क्रुश्चेव्हचेंच वर्चस्व अजून मान्य केलें जातें हें खरें. त्यानें आपल्या बाजूला इतर अंकित कम्युनिस्ट पार्टींनाच वळवून घेतलें आहे असें नव्हे तर उत्तर व्हिएट-नामच्या कम्युनिस्ट पार्टीलाहि आपलेसें केलें आहे. चीनला देण्यांत येणाऱ्या आर्थिक आणि तांत्रिक मदतींत काटछाट करून त्यांच्या औद्योगिक प्रगतीला खीळ घालण्याचें सामर्थ्यहि त्याच्याजवळ आहे. आणि म्हणूनच माओला तो आपले शब्द मागे घ्यायला लावण्याची शक्यता आहे. किंवा कमीत कमी चिनी कम्युनिस्ट टीकाकारांचीं तोंडें तरी तो बंद करू शकेल. परंतु ह्यामुळें मूळ झगडा सुटत नाहीं. ह्या झगड्याचें मूळ कारणच हें कीं आपल्या महत्त्वाकांक्षेमुळें व राष्ट्रीय अहंकारामुळें चीन रशियाला डोईजड होऊं लागला आहे. कम्युनिस्ट







तत्त्वप्रणालीप्रमाणें शेवटीं जगांत एकच विश्वराज्य ( world state ) निर्माण व्हावयास हवें. कोणत्याहि योजनेसाठीं एकच मध्यवर्ती संस्था हवी, कोणत्याहि वैचारिक प्रसारासाठीं फक्त एकच पीठ असावयास हवें. अर्थव्यवस्थेच्या वा वैचारिक प्रसाराच्या क्षेत्रांत मुक्त स्पर्धा ( Free competition ) असूं शकणार नाहीं परंतु अशी जर एखादी सर्वोच्च सत्ता अस्तित्वांत येणार असेल तर रशियाच्या मतें मॉस्को हाच तिचा केंद्रबिंदू होऊं शकेल रशियाला आपल्या सामर्थ्याची आणि यशाची जाणीव आहे, आपल्या सिद्धीविषयीं त्याला अतोनात गर्व आहे आणि मागासलेल्या देशांकडे एकतर उपेक्षेनें किंवा पितृभावानें पाहण्याची त्याला संवय आहे. पेकिंगकडून अपमानास्पद शत्रुत्व सहन करण्याची त्याला संवय नाहीं किंवा चीनच्या स्वाभिमानाला धक्का न लावतां हा प्रश्न हाताळण्याइतकी त्यांना अक्कलहि नाहीं.

' परंतु या सर्वांचा अर्थ इतकाच कीं माओ-त्से-तुंग आणि चिनी कम्युनिस्ट यांच्या परराष्ट्रीय धोरणाचा मूलभूत पराजय झालेला आहे. चीनची कल्पना अशी कीं रशियाच्या आर्थिक लष्करी आणि राजकीय पाठिंब्यावर आपण कोणत्याहि पाश्चिमात्य राष्ट्राशी मुकाबला करूं शकूं. आज जर रशियाकडून चीनच्या हितसंबंधांची हेळसांड होत असेल आणि जर ह्याविरुद्ध निषेधाचा आवाज उठविण्याइतकी शक्ति चीनजवळ नसेल तर मात्र ज्यांची राष्ट्रावरील भक्ती मार्क्सवादावरील भक्तीपेक्षां जाज्वल्य आहे अशांच्या मनांतून आजचें चिनी नेतृत्व पार उतरून जाईल. शेवटीं आंतरराष्ट्रीय राजकारणांत एका बाजूस झुकण्याचें तत्त्व माओचेंच, आणि तोच प्राप्त परिस्थितीस जबाबदार आहे.

' रशियाबरोबरची ही तणातणी लपवून ठेवणेंहि अशक्य आहे. ह्या तणातणीबरोबरच आर्थिक क्षेत्रांतहि विलक्षण ताण पडत आहे. त्यामुळें आज देशाचें नेतृत्व न करणाऱ्या पण इतर बाबतींत प्रभावी असलेल्या कांहीं व्यक्ती ह्यांतून मार्ग काढण्याचा प्रयत्न करतील. आणि त्यामुळेंच अंतर्गत स्वास्थ्य आणि आंतरराष्ट्रीय कारभारांतील लपवाछपवी साध्य होऊं शकेल. आहे ह्या परिस्थितींत हा पुढाकार घेणें फक्त सैन्याच्याच हातांत आहे. आज सैन्यांतील अधिकाऱ्यांना पार्टीचे निर्णय मुकाट्यानें पाळण्याच्या आणि पार्टीच्या देखरेखीवर हरकत न घेण्यासंबंधीच्या सूचना येत आहेत. त्यावरूनच पार्टी आणि सैन्य यांचे संबंध बरे नसावेत असा कयास बांधता येतो. १९३७ मध्यें रशियामध्येंहि अशीच परिस्थिति निर्माण झाली होती आणि coup d' e'tat होण्याच्या भीतीनें स्टॅलीनला लाल सैन्याचें शिरकाण करावें लागलें होतें.

' जर ह्याच पद्धतीचा अवलंब माओलाहि करावा लागला तर तो मात्र त्याचा व्यक्तिगत पराभवच म्हणावा लागेल. कारण आजच्या चिनी राष्ट्राचा निर्माता म्हणून त्याची अशी ख्याती आहे कीं आपल्या अनुयायांतील अनेक मतभेद स्टॅलीनच्या पद्धतींचा वापर न करतां तो निस्तरूं शकतो. परंतु आज तर असें दिसतें कीं १९३० सालीं रशियांत उद्‌भवली तशीच परिस्थिति आज चीनमध्यें उद्‌भवली आहे. राजकीय वातावरणांतील अस्वस्थता आणि रशियानें अपेक्षित पाठिंबा न दिल्यामुळें आलेली निराशा यांतून चीनमध्यें अशांतता निर्माण झाली नाहीं तरच नवल. रशियापेक्षां चीनमध्यें वेगळी स्थिति उद्‌भवण्याचीहि शक्यता आहे आहे हीच परिस्थिति असतानांच जर माओला मृत्यु आला तर त्याच्यामागच्या वारसाला माओप्रमाणें आपल्या व्यक्तिगत प्रतिष्ठेचा उपयोग करून घेतां येणार नाहीं. आणि पार्टीच्या नेतृत्वासाठीं सुरू झालेली स्पर्धा ही आजच्या परिस्थितींत चिनी राजवटीला फार घातक ठरेल.



अनुक्रमणिका






आपल्या आंखीव प्रचाराच्या साहाय्यानें चिनी कम्युनिस्टांनी सामान्य जनतेच्या मनांत अमेरिके-विषयीं विलक्षण द्वेष भरवला आणि औद्योगिक उत्क्रान्तिविषयीं तिला उत्साहित केलें याबद्दल शंकाच नाहीं. ह्या भावनेमुळें पार्टीची शक्ती वाढली आणि तिच्या सत्तेपुढें मान तुकविण्यांत चिनी जनता तयार झाली. परंतु रशियाकडून न मिळणारा पाठिंबा आणि उद्याच्या भव्य स्वप्नांच्या बदल्यांत आज हातांत आलेली करवंटी या गोष्टींची जाणीव जर चिनी जनतेला झाली आणि साम्राज्यवाद्यांविरुद्ध कम्युनिस्टांची एक जागतिक फळी उभी करण्याच्या त्यांच्या भ्रमाला जर तडा गेला तर मात्र चीनमध्यें विलक्षण अशांतता माजेल. "शेंकडों फुलें फुलूं देण्याची" घोषणा फार अल्पकाळ टिकली. पण तेवढ्या वेळांतच कम्युनिस्ट पार्टीला विरोध किती जबरदस्त आहे तें दिसून आलें. आज विरोधकांना दडपून टाकण्यांत आलें असलें तरी ते नेस्तनाबूत झालेले नाहींत. पार्टी आजहि शक्तिशाली आहे परंतु लक्षणें तर अशीं दिसत आहेत कीं भविष्यकालांत तिला आणीबाणीच्या परिस्थितीला तोंड द्यावें लागणार आहे.'

Current History च्या डिसेंबर १९६० च्या अंकांतील G. F. Hudson यांच्या The stability of Mao's Regime ह्या लेखाचा हा गोषवारा. चिनी आक्रमण हा नित्याचा चर्चेचा आणि क्षोभाचा विषय बनलेला असतांना चिनी राजसत्तेच्या आजच्या स्वरूपाविषयीं चर्चा करणारा हा लेख अभ्यसनीय वाटावा ही अपेक्षा.

---

**नवभारत मासिक**

प्रकाशन स्थळ: ३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशन दिनांक: दरमहा एक तारीख.

मुद्रक: मधुकर शंकर साठे.
जात : हिंदु.
पत्ता : दि प्राज्ञ प्रेस,
३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशक : वि. म. बेडेकर.
जात : हिंदु.
पत्ता : ३१५ गंगापुरी वाई.

संपादक मंडळ : आचार्य स. ज. भागवत.
जात : हिंदु.
पत्ता : मौनी विद्यापीठ.
गारगोटी— ( कोल्हापूर )
—हरी कृष्ण मोहनी.
जात : हिंदु.
पत्ता : मोहनी बंगला, धरमपेठ नागपूर.
-प्रा. वि. म. बेडेकर.
जात : हिंदु.
पत्ता : ७८३ शिवाजी नगर पुणें. ४.
-प्रा. गोवर्धन पारीख, का. संपादक.
जात : हिंदु.
पत्ता : गणेशभुवन २७६ तेलंग रोड
माटुंगा—मुंबई १९.

मालक : प्राज्ञ पाठशाळा मंडळ
गंगापुरी, वाई

[ रूल नंबर ८, रजिस्ट्रेशन ऑफ् न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वयें प्रकाशित. ]

श्री. श्री रा. टिकेकर

# छत्रपती संभाजी चरित्र : २ :

महात्मा गांधीच्या जीवनाचा वास्तविक चित्रपट बनवावा म्हणून आज अनेक वर्षे प्रयत्न चालू आहेत. निरनिराळ्या देशांतून त्यासाठीं उपलब्ध असलेले वार्तापटाचे ' तुकडे ' किंवा उपलब्ध असलेली ' फिल्म ' येऊन पडली आहे. गांधी स्मारक निधीनें इतकीं वर्षे त्यासाठीं खटपट केली– अखेर तें कार्य भारत सरकारच्या ' फिल्म्स डिव्हिजन ' कडे सोंपविलें. इतकीं वर्षे झालीं. पण अद्याप संपूर्ण गांधीचरित्र ( फिल्मी ) तयार झालें नाहीं.

असाच कांहींसा प्रकार संभाजी चरित्राबाबत झालेला दिसतो. मात्र श्री. बेंद्रे हे एकुलते एक खटपट करणारे आहेत. देशविदेशाचे दप्तरखाने धुंडाळून, अनेक पोथ्या –पुस्तकें तपासून, त्यांतील शेकडो हजारों उतारे त्यांनीं स्वहस्तें नकलून आणले; पद्धतशीर रीतीनें ते लावून ठेवले. आतां तर ह्या प्रचंड पुस्तकांत त्यापैकीं पुष्कळसे छापूनहि काढले. तरी अद्याप " संभाजी चरित्र " वाचकांच्या दृष्टीस पडावयाचें राहिलें आहे. त्या चरित्रासाठीं उपयोगी असें पुष्कळसें साहित्य मात्र तयार झालें आहे.

संभाजी चरित्र प्रचलित आहे, त्यापेक्षां अगदींच निराळें दर्शन या चरित्रग्रंथांत होतें असा पुरस्कर्त्यांचा अभिप्राय प्रारंभींच छापला असल्यानें त्याबद्दल वाद करतां येत नाहीं. आमच्यासारख्या सामान्य वाचकाला मात्र त्या दिव्य–दर्शनाचा लाभ मिळाला नाहीं, हें स्पष्ट मत व्यक्त करण्याचें स्वातंत्र्य असल्यास आम्हांस तें हवें आहे. संभाजीचे कांहीं पराक्रम आम्हांस अज्ञात असतील; ते नव्यानें कळले तर ते वाचण्यांत, ते वाचून आद्य छत्रपतींच्या या प्रतापी पुत्रास मानाचा मुजरा करण्यासाठीं आणखी नव्यानें आमचें शिर झुकेल. त्याजवर ' इतिहासांत ' झालेले आरोप खोटे ठरले तर त्यांतहि आम्हांस आनंदच होईल आणि म्हणून जी कांहीं नवी माहिती संशोधनानें उपलब्ध झाली असेल ती निवडून आम्हांसारख्या अज्ञ वाचकांना सांगावी अशी आमची अपेक्षा. आमच्या पुढें एवढा मोठा ढीग आहे कीं त्यांतील ' मोतीदाणा ' हुडकण्यास फार कष्ट पडतात !

श्री. बेंद्रे यांचा आजवरचें संशोधन पहातां, त्यांना हें कार्य– दाणा निवडण्याचें- सहज साधण्यासारखें आहे. या उपलब्ध ग्रंथांत मात्र तें पार पाडलेलें दिसत नाहीं. दडलेलें हुडकण्याचें कौशल्य आम्हांस साध्य नसल्यानें नवें शंभुचरित्र मिळण्याची आशा करीत रहावें - एवढें आमच्या हातीं आहे.

संशोधनाचा बारकावा म्हणतात तो श्री. बेंद्रे यांनीं पराकोटीला नेलेला आढळतो. श्रीशिवछत्रपतींचें स्वर्गारोहण हा कांहीं वादग्रस्त मुद्दा नव्हे. त्यांच्या जन्मतिथीबद्दल वाद आहे तसा ह्या पुण्यतिथीबद्दल तर मुळींच नाहीं. तरी किती तरी फॅक्टरी रेकॉर्डसूचा दाखला त्यांनीं दिला आहे. शिवाजीनंतर अधिकार कुणाला प्राप्त झाला. ह्याबद्दल ह्या वखारवाल्यांचा पुरावा मानण्याचें कारण नाहीं कारण खरी बातमी त्यांना कळण्यासारखी नव्हती. ज्यांना शिवछत्रपतींच्या मृत्यूची बातमी कळण्यास दोन तीन आठवडे लागले, त्यांना इतर बातम्या अचुकपणें कळत असतील असें कसें समजावें ?

राजापुरच्या वखारवाल्यांनीं ही बातमी १५ दिवसांनीं दिली. कारवारच्या वखारवाल्यांनीं तीन आठवड्यांनीं ही बातमी कळविली. मुंबईला तर २४ दिवसांनीं ही खबर कळली. सुरतकरांना सुमारें महिन्याभरानें सुद्धां ही बातमी खरी वाटेना ! एप्रिलच्या पहिल्या चार पांच दिवसांत घडलेल्या मृत्यूची खात्रीलायक बातमी सुरतकर ऑक्टोबरमध्यें देतात. कलकत्तेकर मग ह्या बातमीवर विश्वास ठेवीत नव्हते हें नवल नव्हे. डच वखारवाल्यांचेहि रपोट याबाबत काय होते – हे श्री. बेंद्रे यांनीं उद्धृत केलें आहेत. ( पृ. १४५ ) आणि ह्या सर्व आधारांवरून निष्कर्ष काय काढला ? तर " संभाजीविरुद्ध सर्व बनाव अण्णाजी दत्तोचा होता असें स्पष्ट दिसतें. ( पृ. १४६ )










शिवछत्रपती मध्यंतरी आजारी झाले तेव्हां मात्र त्यांचा अंत झाल्याची बातमी १०-१२ बखार-पत्रांतून आली असल्याचा पुरावा सादर कशासाठीं केला ? बखारवाल्यांच्या पत्रव्यवहारावर, त्यांत असलेल्या तपशिलावर इतका भरवसा तरी मग कां ठेवावा ? एकीकडे त्यांत गप्पा, बाजारगप्पा, किती आहेत त्या सांगावयाच्या-आणि दुसरीकडे त्याच बखारवाल्यांच्या असल्या बातमीपत्रावर इतिहास रचायचा, हा अजब प्रकार आम्हांस कळत नाहीं. तर्क चालविण्याबाबत श्री. बेंद्रे यांनीं पुष्कळ विक्रम केले आहेत. शिवछत्रपतींच्या मृत्यूप्रसंगीं ते सांगतात : " (आजारांत) शिवाजीस भ्रान्त (? शुद्ध हा शब्द युक्त दिसतो) नसली पाहिजे... म्हणूनच त्यांस सोयराबाईनें विष घातलें ही कंडी उठूं शकली. आजारांत शुद्ध असती तर कंडीचें कारणच राहिलें नसतें ! " (पृ. १५४) असाच तर्क, " राजारामास–राज्य द्यायचें असतें–तर प्रकरणीं " चालविला आहे. " मृत व जिवंत -- शिष्टांना " (पृ. १५३) शिवाजी महाराज झाले तरी चार गोष्टी कशा सांगणार ? आपल्या लिहिण्याचा अर्थ काय निघतो, हेंहि श्री. बेंद्रे पहात नाहींत – म्हणून आम्हा वाचकांची दिशाभूल होते. खरा अर्थ समजावून घेण्यास कोणा सवाई-संशोधकाचें साहाय्य घ्यावें लागतें. आणखी एक उदाहरण पहा : " सारांश, राज्यविभागणीची कल्पना शिवाजीराजांची नसल्यानें हंबीररावाला त्यांच्या कपट-मर्कट कृतीचा राग आला." (पृ. १५५) ही कपट-मर्कट कृति (म्हणजे काय ?) अर्थातच श्रीशिवछत्रपतींची नाहीं. म्हणून बेंद्रे यांचें पूर्वीचें लिखाण थोडें बारकाईनें तपासल्यावर मध्यंतरीच्या १६ ओळी संस्कृत काव्याच्या व इतर दोन चार ओळी सोडल्यावर मागें " मोरोपंत व अण्णाजीपंत या द्वयींचा." (पृ. १५४-५५) उल्लेख आढळतो आणि ही कपट-मर्कट-कृति, त्या द्वयीची असावी असें वाटतें ! इतका दूरान्वय जोडण्याची आवश्यकता, नव्यानें उपलब्ध होणाऱ्या संभाजी चरित्रांत तरी नको होती, असो. निश्चित घटनांबद्दल पुष्कळसे आधार दिल्याबद्दल एक वेळ वाईट वाटणार नाहीं. पण कित्येक गोष्टी नव्यानें सांगितल्यावर त्यांसाठीं आधार अवश्य दाखविला पाहिजे. शिवछत्रपतींनीं कलुशाला " छंदोगामात्य " नेमलें होतें. (पृ. १६३) पूर्वींपासून नेमलें होतें, या विधानास आधार मिळत नाहीं. * " आंग्रे यांनीं माणसें तयार करीपर्यंत दर्यावर्दीपणांत मराठे अनभिज्ञ, लंगडे व सराव नसलेले असे होते " (पृ. ३३०) हें विधान बिनाधार आहे–तें अतिरंजित तरी असावें किंवा मराठे, दर्यावर्दीपणा... या शब्दांचे अर्थ तरी श्री. बेंद्रे निराळे समजत असावे. ' मचुळ ' या शब्दाचा त्यांचा अर्थ " मधुरजल " आहे असें वाटतें. (पृ. ३५०) म्हणून विशिष्ट शब्दार्थांचो पृच्छा. मुंबईंत " राजक्रांति " झाल्याचा निर्देश देखील (पृ. ४३५) कोणत्या तरी वेगळ्या अर्थानें असावा. संभाजीराजे मोगलांकडे गेल्यानंतर शिवभूपतींस " कृतकर्माचा खेदहि झाला व आपल्या दुष्ट मन्त्र्यांच्या सल्ल्यानें आपण फसलों " (पृ. ७६) असें त्यांना वाटलें ही कविकल्पना तर नव्हे ? दुष्ट मंत्री शिवरायांवर कोणी लादले होते ? ते दुष्ट आहेत, नालायक आहेत, अयोग्य आहेत असें समजतांच त्यांना कामावरून कमी करण्यास छत्रपतींनीं कां कचरावें ? पण हा शोध श्री. बेंद्रे यांना कुठें लागला तें त्यांनीं सांगितलें नाहीं. पुढील काव्यांतील उताऱ्यावरून तो अर्थ निघत नाहीं.

" पोर्तुगीज–गोवा लढाई " हें १३ वें प्रकरण श्री. बेंद्रे यांच्या संशोधनाचें प्रातिनिधिक समजतां येतें. यांत पुष्कळ माहिती --' पाटीभर ' टीपा, भरपूर उतारे आढळतात. अनेक लढायांची माहिती येते. पण एकाहि समरप्रसंगाचें सरळ, सोपें वर्णन आढळत नाहीं. कोणाचें शौर्य, कोणाचा लष्करी कावा, कोणाची मुत्सद्देगिरी ... इत्यादि कुठल्याहि गुणाची ओळख पटत नाहीं. उताऱ्यांच्या जंगलांत वाटच दिसेनाशी व्हावी तसा प्रकार झाला आहे. मोठी तीव्र निराशा वाच-

* " महमूद गावानच्या कोंकणस्वारींतून लिहिलेलीं १४ पत्रें अनुवादून श्री. सेतु माधवराव यांनीं वसंत [ मासिक ] मुंबई ४, मार्च १९६१च्या अंकांत प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत एक उल्लेख असा आहे कीं संगमेश्वरच्या राजाचीं तीनशें समुद्रसंचारी गलबतें होतीं ! ही १५व्या शतकांतली हकीकत पहातां पश्चिम किनाऱ्यावरील रहिवाशी दर्यावर्दी जीवनांत प्राचीन काळापासून सरावलेले दिसतात. " – लेखक








कांच्या पदरीं पडते. बखरकारांचा मोठा दोष म्हणून श्री. बेंद्रे यांनीं एक उपरोधी वाक्य लिहिलें आहे. (पृ. २८४) "कथाख्यानासारख्या लेखनांत कालबोध व स्थलबोध याला महत्त्वच नसतें!" अनेक उताऱ्यांतील स्थलबोध श्री. बेंद्रे यांना साधला नसल्याचे पुरावे पुष्कळ आहेत. त्यावरून वाटतें कीं बखरकारांचा दोष, स्वतः दोषदिग्दर्शकांनाच चिकटला कीं काय? चौल, फोंडा, चांभारखुंदें ...... या मोहिमांचें सरळ वर्णन तरी कोठें मिळतें कां म्हणून वाचक डोळे फाड फाडून वाचतो; पण शेवटीं त्याला निराश व्हावें लागतें. "फोंडा" वर्णन (लढाईचा वृत्तांत) पृ. ३०० ते ३०४ या अवकाशांत आहे. पृ ३०३ वरील "९ नवंबर" नें सुरू होणाऱ्या छेदकाचा अर्थ कळतो कीं काय तें पहावें. हे सर्व उतारे आहेत -- त्यांचा मराठी अनुवाद करतांना चूक झाली नसली, तरी असे अर्थ समजण्यास कठिण उतारे देण्याचें प्रयोजन काय? उताऱ्यांबाबत चिकित्सा अवश्य व्हावी. उतारे ज्याचे घेतले त्याची दृष्टि साफ असल्याची खातरजमा करावी अशी वाचकांची अपेक्षा. खिस्ती पाद्र्यांनीं हिंदूंच्या पाखंडीपणाची निंदा करावी; व्यंकोजीनें धर्मादायद्रव्याचा अपहार केला असें म्हणावें; (पृ. ५२१) आणि श्री बेंद्रे यांनीं असल्या उताऱ्यावर साधक बाधक भाष्य न करतां तें तसेंच छापावें, हें अत्यंत अनुचित होय. व्यंकोजीच्या हातून असलें कृत्य होणार नाहीं, अशी खात्रीच श्री. बेंद्रे यांना वाटत नसावी; किंवा त्यांच्या खिस्ती पाद्र्यांवर अमाप विश्वास असावा. जेसुइटांनीं किती अमानुष अत्याचार केले; इन्क्विझिशनच्या नांवानें केवढें क्रौर्य दाखविलें; धर्माच्या नांवाखालीं माणुसकीला काळिमा लावणारे गुन्हे किती केले– याचा सविस्तर पाढा श्री बेंद्रे यांनींच प्रस्तुत ग्रंथांत वाचला आहे म्हणून बरें. (पृ. ३२२-२८). "नालायक फादर्सनीं... पोर्तुगालचे राजांपासून घेतलेला सर्व पैसा दाबला होता" (पृ. २९४) अशी त्यांनींच सर्व हकीकत लिहिली आहे. तरी अशा विकृत वृत्तीच्या लेखकांचें म्हणणें वेदवाक्य मानण्यास श्री. बेंद्रे तयार झाले!!

जेसुइट फादर्सची जी तऱ्हा तीच इंग्रज वखारवाल्यांची. आमचे व्यापारी – मुत्सद्दी – लबाड आहेत "पैसा हाच त्यांचा देव होय" (पृ. ५४४) म्हणून इंग्रज बनियांनीं आमच्या बांधवांना हिणवावें आणि श्री. बेंद्रे यांनीं असल्या आधारावर तर्कांचे इमले उभारावे हें किती विचित्र आहे बरें? इंग्रजांना पैसा नको होता असें तर नव्हे? मग ईस्ट इंडिया कंपनीची खास स्थापना काय लोकसेवेचें व्रत घेण्यासाठीं झाली होती? इतका उपद्व्याप त्या कंपनीनें जो चालविला तो पैशासाठीं कीं धर्मादाय म्हणून पैसा वाटण्यासाठीं? आणि ई इं. क. च्या वखारींत सर्वत्र किती लबाडी भरली होती, खाबूपणा किती बोकाळला होता, आणि सवड मिळायचा अवकाश कीं मिळेल तो अधिकारी कसा "चरत" होता, हें आतां जगजाहीर झालें आहे. त्या कारभाराचे किती तरी खंड छापून प्रसिद्ध झाले आहेत. कंपनीच्या डायरेक्टरांना किती तरी वर्षें एकच घोर होता – ह्या कारकुनांना, अधिकाऱ्यांना, काबूंत कसें ठेवावें, त्यांचा खाबूपणा कमी कसा करावा. तरीदेखील अशा खादाड, लोभी, अप्रामाणिक वखारवाल्यांनीं आमच्या कांहीं व्यापाऱ्यांची नालस्ती करावी – श्री. बेंद्रे यांनीं ती निखालस सत्य मानून चालावें – याबद्दल आम्हांस खेद होतो. सत्यासत्य पारखण्याचें संशोधनी कर्तव्य यांत पार पडलें नाहीं, म्हणून आमच्या संशोधनाचा दर्जा खालावतो – ही मुख्य तक्रार. वखारवाले खाबू – आमचे कांहीं व्यापारी-मुत्सद्दीहि खाबू असतील. पण एका खाबूनें दुसऱ्या खाबूला नांवें ठेवलीं तर तिऱ्हाइतानें त्या आरोपाची पारख कसोशीनें करावी हें उघड आहे. म्हणून वखारवाल्यांनीं आमच्या कांहीं व्यापाऱ्यांच्या लोभाबद्दल-द्रव्याच्या हव्यासाबद्दल–वाटेल तसें लिहावें–आणि त्या आधारें श्री. बेंद्रे यांनीं स्वजनांस आणखी दोष द्यावा, वखारवाल्यांचें लिहिणें ब्रह्मवाक्य मानावें ...... हा प्रकार अत्यंत अनुचित होय. मनूचीचे कांहीं उतारे श्री. बेंद्रे यांनीं घेतले आहेत. पण त्या मनूचीबद्दल त्यांचें मत असें नमूद आहे "त्याच्या मजकुरांत बऱ्याच भाकडकथा व तर्क यांचा भरणा असतो. स्वतःची महती दाखविण्याचा प्रयत्न ...... बराच केला आहे. त्याला ...... व्हाइसरॉय जवळ मानहि नव्हता– त्याची कामगिरीहि महत्त्वाची नसावी." (पृ. ३०८) तरी त्याचे उतारे घेण्यांत मात्र








कमतरता नाहीं. पुनः एकदा मनूचीच्या लेखनांतील उतारे अनुवादिल्या नंतर शेरा मारला आहे :" स्वतःची वढाई सांगण्याकरितां माहिती लिहिली आहे. ...... कालानुक्रम व सरकारी अहवाल यांचा विचार करितां ती चुकीची ठरते." (पृ. ३१२)

ह्या पोर्तुगीज-गोवा लढाई प्रकरणाचीं ५५ पानें असलीं तरी त्यांत वखारवाल्यांच्या पत्रव्यवहारांतल्या सुमारें ११५ टीपा आहेत! उतारेच उतारे असें ह्या संभाजी चरित्राचें वर्णन केल्यास तें चूक ठरणार नाहीं.

मोठ्या परिश्रमानें हजारों दप्तरांतील उतारे निवडावे, काळजीपूर्वक ते उतरून घ्यावे; वर्षानुवर्ष ते जतन करून ठेवावे- पण त्याचा संभाजी चरित्रास प्रत्यक्ष उपयोग कितो, एवढें मात्र सहजपणें लक्षांत येऊं नये, असा प्रकार श्री. बेंद्रे यांचा झाला असल्याचें ह्या ग्रंथराजांत जागोजाग आढळतें. "इंग्रजांची तटस्थता" हें १६ वें प्रकरण त्या दृष्टीनें मासलेवाईक आहे. पृ. ३९६ ते ४६२ अशा ६६ पृष्ठांत त्या तटस्थतेचा विस्तार आहे. सुमारें दोनशें तळटीपा एवढ्या विभागांत येतात. म्हणजे दर पानास तीन अशी सरासरी पडली. एकेका टीपेंत अनेक ग्रंथांचे, फायलींचे, पत्रांचे संदर्भ आहेत. शिवाय थोडे इंग्रजी उतारेहि दिले आहेत. हा सर्व भाग दोनदां तीनदां वाचून देखील यामुळें संभाजी चरित्रांत भर काय पडली हें नीट समजेना. लंडनहून ईस्ट इं. कंपनीनें, सुरतच्या वखारवाल्यानें, मुंबईच्या अधिकाऱ्यांनीं शिवाजी-संभाजी बाबत धोरण काय ठेवावें याबद्दल केलेली उलटसुलट चर्चा किंवा त्यांचे निर्णय यांवरून सामान्य वाचकानें काय समजावें? आमची अपेक्षा अशी कीं संशोधकानें महत्कष्टानें जमविलेलें साहित्य, वाचून, पचवून, त्याचा परिपाक आम्हां वाचकांसाठी लिहिलेला असावा.

ह्या प्रकरणांतला तिसरा हिस्सा शिवकालासंबंधींचें निवेदन आहे. उताऱ्यांचा मराठी अनुवाद घाईनें झाल्यामुळें असो, अनवधानानें असो, पुष्कळ वाक्यें अपुरीं राहिलेलीं दिसतात. सुरत, मुंबई, लंडन, राजापुर, इथले इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज, आणि सिद्दी अशांचा संबंध या प्रकरणांत मराठ्यांशीं आला असल्यानें स्पष्ट अर्थ समजत नाहीं अशीं पुष्कळ वाक्यें आहेत. मागला पुढला संदर्भ लक्षांत घ्यावा, आपणांस ठाऊक आहे तो इतिहास आठवावा-मग कुठें त्या उताऱ्यांचा बोध होतो.

उदाहरणार्थ : "मध्यंतरी सिद्दीला शिवाजीराजांच्या किनाऱ्यावर लूट करूं दिली" (कुणीं?) पुढलें वाक्य—

फ्रेंचांनीं ८८ तोफा व बरेंच कथिल दिल्यानें (कुणाला?) इंग्रजांना व सिद्दीला आतां शिवाजीराजांची भीति वाटूं लागली...... वकिलाचोहि राजापुरच्या हिशोबाबाबत घासाघि (?) स चालू होती. (कुणाचा वकील? कुणाशीं घासाघीस करतो?) त्यामुळें ( = ह्या घासाघिसीमुळें?) सिद्दीहि जरा नरम झाला...... हीं वाक्यें पृ. ४०१ वरचीं आहेत. अशीं कितीतरी वाक्यें काढून दाखवितां येतील. साधनांची चिकित्सा सामान्य वाचकांनीं करावी अशी अपेक्षा असली तरी तीं साधनें नीटप्रकारें सादर झालीं पाहिजेत ना?

दुसऱ्या प्रकारचा गोंधळ पहा. पृ. ४३० वर इंग्रजी "प्रेसिडेंट" जहाजाचा उल्लेख आहे. तीन वेळां त्या जहाजास **'महामारी'** आणि ८ वेळां **'महागिरी'** असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ काय समजावयाचा तें आम्हांस कळलें नाहीं. 'फत्तेमारी' हा शब्द जहाजांना उद्देशून वापरलेला आढळतो. तसाच "महामारी" हा शब्द आहे कीं काय? मराठी बोल-रिवाजाप्रमाणें महामारी हा एक 'रोग' हि आहे, म्हणून पंचाईत पडते. आणि 'महागिरी' असाहि उल्लेख त्याच छेदकांत, त्याच जहाजासंबंधीं उद्देशून असल्यानें कोडें पडतें. थोडासा उदार विचार करून या प्रकारास -अभावितपणें साधलेला विनोद समजावें झालें!

जमविलेलीं साधनें तपासण्यास देखील श्री. बेंद्रे यास फुरसत मिळालेली दिसत नाहीं. विशेषतः तत्कालीन परदेशीयांच्या दप्तरांत इकडील ग्रामनामांचे व व्यक्तिनामांचे निरनिराळे पर्याय तपासून त्यांचें प्रचलित स्वरूप संशोधकांनीं सांगावें अशी वाचकांची अपेक्षा असते. परंतु आमच्या संभाजीचरित्रकारांना तितकी सवड नव्हती असें समजावें कां वाचकांच्या माहितीची त्यांची कल्पना अवास्तव होती असें म्हणावें? याच प्रकरणांत असा ग्राम-व्यक्तिनामाचा जुना अवतार आढळतो असें नाहीं. इतकेहि






त्याची गाठ पडते. ‘इंग्रजांची तटस्थता’ सांगतांना कोविद (पृ. ४३८), इंटरलोपर्स (पृ. ४४७–४८), हाउजर्स, सुर्नेस, (पृ. ४४९), Goone, Canalarian (पृ. ४४८) अशा शब्दांचा अर्थ समजत नाहीं. सिंपवड (पृ. ४४३) ही कुठली व्यक्ति हें कळत नाहीं. दोरबाज (पृ. २३५); शलापीचें लिहिणें (पृ. २५४); गलझीरचें देवालय (पृ. २७६); ४० व्यासाची तोफ (पृ. ३०१); शेक्स (पृ. ३३७-५२) गलाकडूम (पृ. ३४३) पेंट्री बोलट्री (पृ. ४९४) ह्या जाड ठशाच्या शब्दांचा उपयोग केला आहे. त्यांचा वास्तविक अर्थ काय, लिहिणाराच्या मनांतला अर्थ काय, आजच्या जमान्यांत त्यावरून काय समजावें, इत्यादि निर्णय करूनच हे उतारे–उताऱ्यांतले शब्दप्रयोग वाचकांपुढें ठेवले असते तर बरें झालें असतें. तंजावर जवळचें चेरापुंजी शहर घेतलें (पृ. ४९१) असें सांगतांना आज तें शहर तेथें आहे कीं नाहीं–नसल्यास त्याचें काय झालें, कोणतें खेडेगांव आसपास आलें, ही माहिती अपेक्षित आहे. आमची माहिती मर्यादित असते–आम्हांस ‘चेरापुंजी’ आसामांतली तेवढी ठाऊक–ती सुद्धां एक खेडें म्हणून. पृ ४७२ वर काफीखान ‘अथणी’ बद्दल काय पर्याय वापरतो ते रोमन अक्षरांत सांगितले आहेत. अटताडी–अटतरीता असा कांहीं तरी त्यांचा उच्चार होतो. ह्यांवरून अथणीचा बोध कसा होतो? इतका फरक दोन्ही नांवांत कां पडला? संशोधनाचा अनुभव चार तपांहून अधिक काळ ज्यांना आहे अशांनीं “स्थल” निर्णय कां केला नाहीं याचें कारण कळत नाहीं. कदाचित् त्यांना सवड नसावी. “बक्षेंद्र-बक्ष” (पृ. ६५७-५८) हें वास्तविक सिंहगडाचें (औरंगजेबी) नांव. पण श्री. बेंद्रे यांचा असा समज झालेला दिसतो कीं तें व्यक्ति-नाम असावें. व्यक्ति सूत्रींतहि ह्या नांवाचा समावेश झाला आहे. “साखरपें” या गांवाचें वाचन सर जदुनाथांनीं “शंकरपेठ” असें केल्याचा किस्सा जदुनाथ-सरदेसाई पत्रव्यवहारांत त्याच वेळीं (स. १९१४) वाचावयास मिळतो. पण श्री. बेंद्रे यांनीं जदुनाथांच्या लेखाचा मराठी अनुवाद करतांना (पृ. २०६) शंकरपेठ हें चुकीचें ग्रामनाम तसेंच ठेवलें. शहाजादा अकबर नर्मदा उतरून दक्षिणेंत आला- तेव्हां नर्मदा उताराचें ठिकाण भैसवाड (पृ. १८५) म्हणून बेंद्रे लिहितात-तें महेश्वर-बडवाय असावें. असा स्थल-निर्णय नकाशांच्या साहाय्यानें केला असता, तर पुष्कळ गांवांचा नीट बोध झाला असता. व्हर्वा (पृ. ६१), पिंडोल (पृ. ६३), मांजऱ्या नजीक बहुत पर्वत (पृ. ७९), जिलवर (पृ. १८४); मुंगेर, बिहार, बार, हलसा, सिंजी (पृ. १९८), गोब्रॉन (पृ. २१२-१३), पालटाट (पृ. ४३७) अशीं किती तरी ठिकाणें–त्यांचीं आजचीं नांवें कळत नाहींत. “त्रिचिनोपल्ली–त्रिणामल्ली–तिरूनामली” हीं एकाच गांवाचीं नांवें समजण्यांत कांहीं तरी चूक आहे. विजापूर ही आदिलशाहीची राजधानी आणि विजयदुर्ग हा राजापूरजवळचा जंजिरा किल्ला -- घेरिया -- असंहि नांव असलेला. तरी स्थलसूचींत विजापुर - विजयदुर्ग हें एकाच स्थलाचें नांव असल्याप्रमाणें दाखविलें आहे. पृ. ८७ वर नायकवाडी हें स्थलनाम समजून मजकूर लिहिलेला दिसतो. वास्तविक नाइकवाडी हा पत्तिनायकाचा पर्याय शब्द म्हणून राज्यव्यवहारकोशांत दिला आहे, तो अर्थ ह्या संदर्भांत जमतो.

अशा स्थलनामांप्रमाणेंच “गलझीर” (पृ. २७६) ह्या देवनामाचा तपास होणें जरूर होतें. मुंबईतलें हें गलझीरचें देवालय म्हटल्यानें कुतूहल वाढतें. श्रीप्रवळ हा कुठला भाग? “स्वाली मरीन” (पृ. ४५०) हें ठिकाण कुठलें? इत्यादि जिज्ञासांचें समाधान होत नाहीं.

शहाजादा अकबर प्रकरणीं संभाजीची दिरंगाई व वेळकाढूपणा दोषास्पद वाटतो. बहुतेक इतिहासकारांच्या मतें ही एक सुवर्णसंधि होती- औरंगजेबाला जेर करण्याचें हें मोठें साधन होतें. स्वतः संभाजी मोगलाकडे जाऊन त्यांच्या छावणींत राहिला होता, त्याच्यामागें कांहीं कारस्थान तरी होतें. पण औरंगजेबाचा पुत्र स्वत स “बादशहा” म्हणविणारा, आपण होऊन छत्रपतींच्या आश्रयास आला, त्यानें महाराष्ट्रांत सुमारें पांच सहा वर्षांचा काल व्यर्थ घालविला. अकबराचाहि या प्रकरणीं मूर्खपणा असला तरी हे दोन्ही जवान राजपुरुष (संभाजी आणि अकबर) मूर्ख ठरतील. पण संभाजीच्या आंगीं नव्यानें जे गुण चिकटविण्याचा प्रयत्न होत आहे, त्या गुणांची प्रचीति, अकबरवास्तव्याचा फायदा घेण्यांत दिसत नाहीं.



अनुक्रमणिका






श्री. बेंद्रे यांच्या दृष्टीनें मात्र अकबर प्रकरणीं संभाजीराजांचें कांहीं चुकलें नाहीं. उलट, शंभुराजांनीं फार मोठें धोरण राखलं; प्रचंड राजकारण खेळविलें— आणि शहाजादा अकबराचा "पुरेपूर उपयोग करून घेतला" (पृ. १७४). अकबराच्या बंडाची खबर औरंगजेबाला ता. ७ जाने. १६८१ रोजीं लागल्याची नोंद आहे (सर जदुनाथ सरकारकृत "सनावली"— अप्रकाशित). त्यानें ९ मे १६८१ रोजीं नर्मदापार केल्याचें ठिकाण **भैसवाड** असें श्री. बेंद्रे यांनीं दिलें आहे. तें बडवाय (इंग्रजींत बारवाहा लिहितात तें) किंवा महेश्वर असावें. जूनच्या प्रारंभीं तो पालीस पोचला— संभाजीराजांच्या हद्दींत सुखरूप राहिला. ही तारीखहि श्री. बेंद्रे यांस का उपलब्ध झाली नाहीं तें समजत नाहीं. "**मेवली** (परली) जवळ **माली** (पाली) किल्ल्यांत" तो राहिला (पृ. १८७) असें श्री. बेंद्रे म्हणतात. वास्तविक माहुली किल्ल्याजवळ पाली येथें तो राहिला, असा उल्लेख आहे. आपण घेतलेल्या उताऱ्यांतल्या स्थलांचा निर्णय श्री. बेंद्रे यांनीं फारसा केला नाहीं, ही त्यांच्या संशोधनांतली मोठी उणीव आम्हां वाचकांना वाटते; आम्ही वारंवार घोटाळ्यांत पडतों.

श्री. बेंद्रे यांच्या संशोधनानुसार असें दिसतें कीं संभाजी व अकबर यांची पहिली भेट १३ नोव्हें. १६८२ रोजीं झाली. (पृ. १९९) म्हणजे तब्बल १७॥ महिने छत्रपतींनीं मोगल शहाजाद्याची भेट घेतलीच नाहीं! रियासतकारांच्या मतें ही भेट त्याच तारखेस पण स. १६८१ सालीं (म्हणजे एक वर्ष आधीं) झाली. या दोन इतिहासकारांत आम्हीं वाचकांनीं कुणाची तारीख खरी समजावी? अकबराशीं संभाजीचें आचरण झालें तें सर्वस्वीं रास्त होतें अशी समजूत करून घेतल्यानें श्री. बेंद्रे यांची या प्रकरणाची तरफदारी मोठी विचित्र वाटते. "संभाजीराजांनीं अकबराशीं मैत्री केली होती. परंतु त्याचेवर पूर्ण विश्वास ठेवला नव्हता" (पृ. ३३१) असें ते एकदां म्हणतात. संभाजीराजांचें हें गुणवर्णन समजून दुसरा नमुना पाहूं. "असलीं तहाचीं बोलणीं अनिर्णित ठेवून शत्रुसैन्यांत अनिश्चिततेचें वातावरण निर्माण करण्याची, त्यांच्या वडिलांपासून (= शिवाजी महाराजांपासून) त्यांस अनुभवपूर्ण शिकवण मिळालेली होती." (पृ. २०७) मोगलांकडून तहाचीं बोलणीं करण्यास आलेल्या वकिलाशीं व खुद्द अकबराशींहि अशीं अनिर्णित बोलणीं ठेवण्याची शिकवण दुसऱ्या छत्रपतींनीं आचरणांत आणली असें वादाखातर मानूं. "वचन दिल्याप्रमाणें संभाजीराजांनीं" (पृ. २०९) व्यवस्था केली आणि हे अकबरशहा "फ्रेंच व डच लोकांच्या" जहाजांत (दोघांच्या जहाजांतून एकदम एकाच वेळीं?) बसून इराणांत गेले. आतां पर्यंतची समजूत अशी कीं या वाया गेलेल्या संधीमुळें वैतागून, कंटाळून अकबर इराणांत गेला. पण श्री. बेंद्रे यांचें संशोधन निराळें आहे: "संभाजी राजांनीं त्याची (= अकबराची) यशस्वीपणें रवानगी गेली" (पृ. २१०) कशासाठीं? तें कारस्थान तर ऐका— "अकबरानें शहा आब्बास (= इराणचा शहा) ची मदत घेऊन इराणांतून "खालीं" उतरावयाचें व दुर्गादास व धनाजी प्रभृतींच्या हाताखालीं दिलेल्या सैन्यानें "वर" उत्तर हिंदुस्थानांत शिरावयाचें म्हणजे औरंगजेबाला आपोआपच आपलें सैन्य "स्वगृहा" च्या रक्षणाला परत न्यावें लागेल"........ (पृ. २१०–११)

## Gombron; Gambron

ह्या कारस्थानाला पुष्टिदायक नसला तरी अकबराचें नांव असलेला "गोंब्राम" या बखरींतला (कुठें आहे ही वखार? दोनदां गोंब्रॉम आणि एकदा गांब्रान – पृ. २१२–१३ असा तिचा उल्लेख आहे) पत्रव्यवहार श्री. बेंद्रे यांस सापडला. मद्रासेंतल्या इंग्रज वखारवाल्यांना, इराणांत शहानें अकबराशीं बोलणें काय व कसें केलें, याची बित्तंबातमी लागली!! "दाढीची शपथ घेऊन अकबराला वचन" मिळालें होतें कीं तुला दिल्लीच्या तख्तावर स्थापतों!!! साठ हजार स्वार रवाना केले. आणखी जरूर असल्यास जातीनें मोहिमेवर जाण्यास शहा तयार होता इत्यादि बातम्या मद्रासकरांना "हवेंतून"च कळल्या असाव्या. नंतर चार महिन्यांतच साठ हजारांचे तीस हजार स्वार झाले हा कथाभाग निराळा! तरी देखील श्री. बेंद्रे यांचें भाष्य असें: संभाजीराजांच्या व अकबराच्या संकेताप्रमाणें **येथवर** (?) गोष्टी जुळून आल्या......सैन्यानिशीं अफगाणिस्थानचे सरहद्दीवर (इराणी बाजूच्या?) येतांच (अकबराला) संभाजी पकडल्याची व नंतर






तो मारला गेल्याची बातमी लागली......योग्य संधीची वाट पहात ( अकबर ) तेथेंच ( कुठें ? ) बसला. औरंगजेबाच्या मृत्यूनें ( स. १७०७ मध्यें ? ) ती संधि त्याला मिळाली......ज्या हेतूनें संभाजीराजांनीं अकबराला इराणांत पाठविला होता तो हेतु औरंगजेबाच्या मृत्यूनंतर सफळ झाल्यानें शाहूला पुनः मोगली परचक्राचा नायनाट करून राज्यावर येतां आलें. (पृ. २१३). शेवटीं श्री. बेंद्रे म्हणतात: "अल्पवयी तरुण संभाजीनें आपल्या छत्रपतिपदाची मान्यता ढळूं न देतां अकबरास केलेल्या साहाय्यांतील धूर्तता...... डोळ्यांसमोर आणली...... तर संभाजीच्या राजकारणपटुत्वाची खरी महति सहजच प्रकर्षानें पटल्याशिवाय राहणार नाहीं" (पृ.२१४). हीं अनुमानें निघण्याजोगा आधार मात्र त्यांनीं सादर केलेल्या पुराव्यांत नाहीं. उलट अनुपुराणांतला श्लोक (पृ.२१०). **श्रीमच्छाह अकबरे गतवति प्रायेण विघ्नंविना स्वात्मा[illegible] कृतकृत्यमेव मनुते शंभुः प्रतिज्ञान्तरम् ॥** व त्यानंतरचे आणखीहि श्लोक संभाजीच्या कारस्थानाचें किंवा धूर्ततेचें दर्शन घडवीत नाहींत. हातची गमावलेली ही सुवर्णसंधीच होती याबद्दल शंका उरत नाहीं. पण इराणांतील घडामोडींसाठीं मद्रासच्या इंग्रज वखारवाल्यांचें बातमीपत्र आधार घेण्याचा प्रकार मात्र अप्रस्तुत आणि हास्यास्पद वाटतो. वखारींचा आपसांतला पत्रव्यवहार "रेकॉर्ड" या नांवानें ओळखतात म्हणून तो 'अविचारणीय' आधार मानण्याचें मुळींच कारण नाहीं. अकबराची सहनशीलता केवढी मोठी असली पाहिजे ! संभाजीच्या मृत्यूपासून ते औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत (स. १६८९–१७०७) तो योग्य संधीची वाट पहात "तेथेंच" बसला. अगस्तिमुनीची वाट पहाणाऱ्या विंध्याद्रीशींच त्या अकबराची तुलना करतां येईल !!! शाहू छत्रपतीनें मोगलीपरचक्राचा नायनाट केव्हां, कसा व कुठें केला, हें जरा विस्तारानें कळेल तर तें हवें आहे. असो.

संभाजी आजकाल जरी मोगल छावणींत होता तरी त्याचा उपयोग दिलेरखानानें किंवा मुअज्झमनें (औरंगजेबाच्या आदेशानुसार असेल) कसा करून घेतला हें पहावें आणि तसलीच संधि संभाजीराजांच्या दारीं चालून आली होती– तिचा त्यांनीं उपयोग काय केला, याचा विचार करावा. संभाजी वर्षभराच्या आंत वडिलांकडे परत गेला; पण अकबराचा दृढनिश्चय असा कीं तो परत वडिलांकडे गेलाच नाहीं. त्यानें परदेशांत मरण पत्करलें. शिवाय अकबराबरोबर दुर्गादासासारखा करारी राजपूत साहाय्यक होता– या गोष्टींचा विचार केल्यास संभाजीनें गमावलेल्या संधीचें महत्त्व विशेष ठरतें– आणि संभाजीला ह्या संधीचा लाभ घेतां आला नाहीं– म्हणून त्याचें पारडें वर जातें- मग श्री. बेंद्रे कांहींहि म्हणोत.

शेवटचा एकच प्रसंग पहावयाचा : संभाजी मोगलांच्या हातीं कलुषासह सापडला कसा ? तपशिलाचे बारकावे वेगवेगळे असले तरी मुख्य घटना निश्चित आहेत त्या :– [ १ ] संभाजीनें समोरासमोर प्रतिकार शेवटपर्यंत केला नाहीं; [ २ ] तो तळघरांत किंवा कुठें तरी लपून बसला आणि [ ३ ] तेथून त्याला हुडकून काढलें. कोणत्याहि शूर वीराला शोभण्यासारखें हें वर्तन नाहीं. छत्रपतींच्या युवराजाला–तो स्वतः छत्रपति झाल्यानंतर तर मुळींच शोभण्यासारखें नाहीं. म्हणून जाणत्यांनीं तर्क केला कीं या वेळीं तो "निशेंत" असावा, तर चुकलें कोठें ? याबद्दलच बारीक सारीक तपशील कुठें कुठें कसे आहेत याविषयीं श्री. बेंद्रे यांनीं सविस्तर चर्चा केली आहे. पण मूळ मुद्दा–संभाजीनें "पळणें" योग्य होतें कां ? किंवा लपून रहाणें रास्त होतें कां ? याबद्दल अवाक्षर काढल नाहीं. वाडा सरदेसायांचा होता – तो संभाजीसाठीं खास बांधला नव्हता. उभयपक्षीं सैन्य कितीपट लहानमोठें होतें किंवा लपला ती जागा मंदिर होतें कीं वाड्यांतलें तळघर होतें – ह्या तपशिलाची विस्तृतपणें शहानिशा करणारांनीं हा मुख्य विचार डावलून टाकणें रास्त नव्हे. सर्व पुरावा सादर झाला आहे तो वाचून कुणासहि वाटेल कीं क्षत्रियांस, मराठ्यांस, छत्रपतींस, संभाजीसहि न शोभेल असें आचरण ज्या अर्थीं घडलें आहे त्या अर्थीं 'शंभुराजे बेभान' असावे. आणि यांत, हा संभवनीय तर्क मान्य करण्यांत, कांहीं बिघडत नाहीं.

संभाजी चरित्रांतील प्रसंग या पद्धतीनें तपासूं लागल्यास मळ ग्रंथाइतका विस्तार करावा लागेल. पण



अनुक्रमणिका






आतां पर्यंतच्या दोन चार बाबींवरून श्री. बेंद्रे यांच्या संशोधनपद्धतीची कल्पना येईल, इतके उतारे या ग्रंथांत येतात कीं त्यांच्या मुळें इतिहास दिसेनासा होतो. राज्यावर येतांच संभाजीनें केलेल्या पराक्रमांची सुसंगत हकीकत न सांगतां ह्या वखारवाल्यानें असें म्हटलें त्या वखारवाल्याची खबर अशी होती– मद्रासकरांनीं असें लिहिलें– सुरतकरांनी तसा जबाब दिला– अशा उताऱ्यांची भयंकर गर्दी झाली आहे. ह्या उताऱ्यांत उलट सुलट बातम्या, बाजारगप्पा, ऐकिव कहाण्या... विपर्यस्त खबरी ... आहेत. हें स्वाभाविक होय. पण आश्चर्य हें कीं त्या जशाच्या तशा. त्यांचें खंडन-मंडन न करतां, छापल्या आहेत. जरूर तेथें मात्र त्यांचा उपयोग आपल्या आवडत्या युक्तिवादाला केला आहे. आधीं साधनांची तपासणी झाली पाहिजे– त्यांतील ग्राह्याग्राह्यता पारखली पाहिजे आणि मगच संगतवार, आधारभूत अनुमान काढतां येईल. श्री. बेंद्रे यांचा कटाक्ष बखरकारांची ओळ न् ओळ तपासण्याकडे तेवढा आहे. बाकी वखारवाल्याचे रपोट किंवा संस्कृत काव्यांतील उतारे त्यांनीं वेदवाक्याप्रमाणें मानलेले दिसतात. संभाजीचरित्राबाबतच्या त्यांच्या संशोधनास हें फार मोठें वैगुण्य आहे.

हुतात्म्याचें मरण पत्करणारा संभाजी अंतकाळच्या यातनांमुळें– त्या सोसण्याचें पत्करल्यामुळें–श्रेष्ठ ठरतो यांत तिलप्राय संदेह नाहीं. ह्या एकाच घटनेमुळें त्याचे पूर्वीचे अपराध, [ चुका हव्या तर म्हणा ] फारसे लक्षांत घेण्याकडे वृत्ती होत नाहीं परंतु ऐतिहासिक घटनांची छाननी करावयाची तर ज्या पद्धतीनें श्री. बेंद्रे यांनीं केली आहे; ती पत्करल्यानें सत्य तर दूरच रहातें – घोटाळा मात्र वाढतो. श्री. बेंद्रे यांनीं जमविलेलें साहित्य नीट मांडून, त्याचें मूल्यमापन करणें जरूर आहे. त्या साहित्यावरून त्यांनीं एक संभाजीच्या कालखंडाची "शकावली" [ क्रोनॉलजी ] तारीखमितीवार करून पाहिली तर त्यांची त्यांनाच आपल्या अनुमानांतली विसंगति दिसेल–निश्चितता कळेल. हें सर्व साधन विषयवार लावलें, त्याचें नीट वर्गीकरण केलें, तरीदेखील मांडणी अधिक पद्धतशीर होईल.

फितुरांचीच गोष्ट घ्या. प्रस्तुत ग्रंथांत संभाजी राजांच्या अवघ्या नऊ वर्षात फितुरांची यादी, फितुरी बद्दल विचार, पुरावे, किती तरी प्रकरणांत विभागली आहे. ती एकत्र आणणें आवश्यक होतें. तिची पुनरुक्ति टाळणें इष्ट झालें असतें. त्याचप्रमाणें इंग्रजांचे, मोगलांचे संबंध, दक्षिणेंतील इतर शाह्यांचे व्यवहार, यांबद्दल विवेचनाची विभागणी अधिक व्यवस्थित झाली असती तर ग्रंथविस्तार बराच कमी झाला असता.

याहि पेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट अशी कीं संभाजी "चरित्र" प्रचलित कोणतें तरी पूर्वपक्षासाठीं घेऊन मग उत्तर पक्ष करणें सोईचें झालें असतें. विस्तार एवढा वाढला नसता–वाचकांना तें प्रतिपादन सहज समजलें असतें. श्री. बेंद्रे यांनीं एक एक घटना विवेचन-विच्छेदन यासाठीं घेतली–आणि मुख्य म्हणजे रूढ असलेल्या एकाहि संभाजीचरित्राचा उल्लेख त्यांनीं केला नाहीं. तसें पाहिलें तर रियासतकार सरदेसायांचा ' उग्र प्रकृति संभाजी " एवढाच एक संभाजी पुस्तक रूपानें मराठी वाचकांना ठाऊक आहे. तत्पूर्वीची मराठी रियासतीची आवृत्ति फार तर कांहीं जणांच्या वाचनांत असायची. बखरी ह्या अलीकडेच छापून नव्यानें प्रसिद्ध होऊं लागल्या. मध्यंतरी तर त्यांची प्रत अभ्यासासाठीं मिळणें मुष्कील होतें. रियासतकारांचें नांव घेण्यास टाळण्याचीं बेंद्रे यांचीं कारणें समजत असलीं तरी संभाजी चरित्राचा अधिक चांगला उठाव व्हावा म्हणून वैयक्तिक पूर्वग्रह जरा बाजूस ठेवणें आवश्यक होतें. तीच गोष्ट जदुनाथ सरकारांच्या ग्रंथांची. श्री. बेंद्रे यांनीं ज्या फारसी साधनांचा आधार घेतला, ज्यांचे अनुवाद "मॉडर्न रिव्ह्यूत" प्रसिद्ध झाले ( खंड १५, १६, १७ ) म्हणून म्हटलें, ते सर्व जदुनाथ सरकारांचे आहेत, हें नोंदण्यास देखील श्री. बेंद्रे तयार नाहींत! हाहि आग्रह आकलनीय आहे. परंतु ह्या पूर्वग्रहामुळें आम्हां सामान्य वाचकांची थोडी कुचंबणा होते. कशी ती पहा:

सरदेसाई-सरकार यांनीं आपापल्या परीनें मराठी इतिहास लिहिला: सरदेसायांनीं मराठी रियासतींच्या द्वारें आणि सरकारांनीं शिवाजी, औरंगजेब इत्यादि चरित्रांच्या निमित्तानें. त्यांत त्यांनीं उपलब्ध साधनें वापरलीं. आतां सरकारांना ठाऊक नव्हतें असें कोणतें नवें साधन श्री. बेंद्रे यांनीं मिळविलें? "पूर्वसूरीं" ना







वाट पुसायचीच नाहीं. असा "पण" असेल तर सर्व संशोधन अथपासून सुरू करावें. परंतु बखरकारांना उठल्या सुटल्या झोडपत बसण्यापेक्षां बखरकारांचें व इतर साहित्य पचवून तयार झालेलें सरदेसायांचें (अथवा सरकारांचें) संभाजी चरित्र "हल्लया" साठीं निवडणें इष्ट झालें असतें.

जदुनाथ सरकारांनीं बरेंचसें फार्सी साहित्य इंग्रजींत अनुवादिलें. बेंद्रे यांनीं त्या इंग्रजी अनुवादाचा मराठी अनुवाद केला. कांहीं कांहीं फार्सी साहित्याचे वेगळे अनुवाद श्री. बेंद्रे यांनीं उपयोगांत आणले. अनुवाद कोणतेहि असोत-कोणाचेहि असोत. त्यावरून भिन्न भिन्न अर्थ निघतात, किंवा विपर्यास होतो. तेव्हां कुणातरी अनुवादकाच्या प्रमादामुळें असें होतें. सर जदुनाथांसारख्यांचे असले "प्रमाद" पानिपतच्या निमित्तानें श्री. सेतुमाधवरावांनीं (अनेक फार्सी साहित्यांच्या अनुवादांत) दाखविले आहेत. ते टाळण्याचा एक मार्ग असा कीं–उपलब्ध साहित्याशीं अनुवादांची तुलना करून पहावी. सरकारांनीं केलेल्या अनुवादाशीं आपला अनुवाद ताडून पहाण्यासाठीं तरी श्री. बेंद्रे यांनीं जदुनाथांचे ग्रंथ चाळणें आवश्यक होतें. बेंद्रे यांस रुचो वा न रुचो, सरकारांचे ग्रंथ अधिक प्रसार पावलेले आहेत. आणि संभाजीचें नवें यथार्थदर्शन घडविण्यासाठीं तरी अशा प्रसृत पुस्तकांचा विचार होणें जरूर होतें. आतां सरकार आणि बेंद्रे यांच्या अनुमानांत (एकाच साधनावर आधारलेल्या) किंवा माहितींत तफावत पडली तर वाचक गोंधळून जातो. सरकार खरे समजावे कीं बेंद्रे, असा प्रश्न पडतो.

उदाहरणार्थ, जयसिंहानें औरंगजेबास सुचविलेला एक बेत पहा. शिवाजीमहाराजांचें काय करावें हा पेंच आगऱ्यास औरंगजेबाच्या मनांत घोळत होता. "शिवाजीला तिकडेच मानसन्मानानें ठेवा आणि त्याच्या मुलाला (= **संभाजीला**) घेऊन तुम्हीं स्वतः दक्षिणेंत स्वारीसाठीं यावें" असा बेत जयसिंहानें सुचविला, हा जदुनाथांचा अर्थ.*

त्याच साधनावरून बेंद्रे म्हणतात कीं, "**रामसिंहास** बरोबर घेऊन दक्षिणेंत यावें" असें जयसिंहानें औरंगजेबास सुचविलें! (पृ. ४२). उभय अभ्यासकांनीं आपापल्या अर्थासाठीं सयुक्तिक कारणें दिलीं आहेत. युक्तिवाद केला आहे. शिवाजीस उत्तरेंत "संभावित अटके"त राखून दक्षिणेंत स्वारीसाठीं येतांना युवराज संभाजी जवळ राखणें हा बेत अर्थात अधिक धोरणी वाटतो. रामसिंहाचें दक्षिणच्या राजकारणांत प्रयोजन कसलें?

असे कितीतरी प्रसंग तुलना करून पहाण्यासारखे आहेत. पण संशोधकांनीं आपलें संशोधन बरोबर केलें आहे कीं नाहीं हें तपासण्याचें कार्य ग्रंथपरिचय करून देतांना कसें करावें? शिवाय तो स्वतंत्र अभ्यासाचा विषय होईल. आणखीहि असें कीं सर जदुनाथ हे मूळचे फार्सी विद्वान नव्हत. इतिहासाच्या अभ्यासासाठीं ते फार्सी शिकले. फार्सी साहित्याच्या (इंग्रजी वा मराठी) अनुवादाची छाननी करावयाची तर श्री. सेतुमाधवरावांप्रमाणें एकादा फार्सी पंडितच या कामीं अधिकारी. नाहीं तर एका अर्धवटानें दुसऱ्या अर्धवटाच्या चुका काढीत रहावें असा प्रकार व्हायचा. प्रमादराहित्य कांहीं अद्याप माणसांत अवतरलें नाहीं. मनुष्य स्खलनशील असल्यानें चुका ह्या होतात. त्या कमी व्हाव्या, झालेल्या लक्षांत याव्या म्हणून तुलनात्मक परीक्षणाची, पूर्वसूरींच्या लेखनाशीं ताडून पहाण्याची आवश्यकता; पण श्री. बेंद्रे यांची याबाबत समजूत कशी पाडावी. त्यांनीं रियासतकार आणि जदुनाथ सरकार यांची दखलच घेतली नाहीं. त्यांनीं काय लिहिलें– किती साधनें वापरलीं, याचाहि ओझरता तपास केला नाहीं, असें दिसतें.

त्यामुळें झालें काय तर श्री. बेंद्रे यांच्या तळटीपा सारख्या वाढत चालल्या. झालेल्या कार्याचा विचार करून पुढें जावयाचें असतें तें अशासाठीं कीं पुनः पुनः तेंच "संशोधन" करण्यांत काल व श्रम व्यर्थ व्यतीत होऊं नये म्हणून. पण श्री. बेंद्रे यांची भूमिका अगदीं नव्यानें सर्व कार्य स्वतः पत्करण्याची दिसते, यासाठीं त्यांचें कौतुक केलें पाहिजे. पण खेद अशासाठीं होतो कीं पूर्वसूरींचा इतका अधिक्षेप करून, किंवा त्यांच्या कार्याकडे ढुंकूनहि न पाहिल्यामुळें बेंद्रे यांच्या संशोधनांत वाटते तितकी नवलाई उरत नाहीं. पुष्कळशा बाबी सरकार-सरदेसाई यांच्या प्रसिद्ध साहित्यांत येऊन

---

* Shivaji & His Times- 4th Edn p. 147.








गेल्या आहेत. त्यांचा पुनः प्रकट उल्लेख अगदीं नव्यानें केला म्हणून त्या नव्या ठरत नाहींत. अस्तु.

संभाजी चरित्रांबद्दल कांहीं स्थूल विचारहि व्यक्त केले पाहिजेत. मराठे-ब्राह्मण वाद, कायस्थ-ब्राह्मण झगडा किंवा शहाण्णव कुळीचे मराठे व इतर मराठे ... अशा प्रकारच्या भेदांचा विचार प्रस्तुत चरित्रग्रंथांत व्हावा याबद्दल मनापासून खेद होतो. संशोधनाचें नवें शास्त्र —त्याचीं साता समुद्रां पलीकडून आणलेलीं नवीं साधनें; आधुनिक कालचें स्वराज्यांतलें १२-१३ वर्षांचें वातावरण, या सर्वांचा साकल्यानें विचार केल्यास ह्या क्षुल्लक भेदांचा उल्लेख अत्यंत अप्रस्तुत वाटतो. कित्येक वेळेला तर संभाजी चरित्र कथनापेक्षां, अण्णाजी दत्तो व रामचंद्रपंत अमात्य या उभायतांची निंदाच अभिप्रेत आहे कीं काय असा ग्रह होतो ! एरवीं संभाजी चरित्रांत राजारामकालीन घटनांचा मुद्दाम तपशील देण्याचें प्रयोजन कळत नाहीं [ पृ. २५५-५६ ].

फ्रायरच्या मुखानें " ब्राह्मण फार लबाड जात आहे–" इत्यादि निंदापुराण वदविलें आहे [ पृ. १०० ]. त्याच्या शेवटीं " हा सर्व रोख अण्णाजी दत्तोवर आहे- " असें भाष्य श्री. बेंद्रे यांचें आहे. आम्हां भारतीयांची अशी नालस्ती करणाऱ्या फ्रायरनें ब्रिटिश वखारवाल्यांच्या लांड्यालबाड्यांबद्दल कांहीं लिहिलें आहे कीं नाहीं तें श्री. बेंद्रे यांनीं सांगण्याचें कां टाळलें ? इंग्रज वखारवाल्यांचा व्यवहार जसा कांहीं पहिल्यापासून शुद्धाचरणी, सदाचारी नोकरांच्या हातीं होता ! अशा लबाडांनीं आम्हां भारतीयांना नांवें ठेवल्याबाबत राष्ट्रीय वृत्तीच्या कुणालाहि वास्तविक राग यायला पाहिजे होता. ... पण " ब्राह्मणांची संभावना " फ्रायरकरवीं परस्पर होते - तर होऊं द्या — हा संभाजी चरित्रकारांचा विचार दिसतो. तो अव्यवहारी आहे — अयोग्य आहे, एवढेंच नमूद करून ठेवावयाचें.

राजमाता जिजाबाई व तिची आवडती सून सईबाई या दोघींचा उल्लेख करून ( पृ. ५१३ ) शहाण्णव कुळींतल्या मराठा घराण्यांतील बायकांची प्रशंसा सांगितली आहे. त्याचप्रमाणें चंपापरिणय प्रसंगीं कुल-गोत्र तपशील सांगून ( पृ. ८४ ) कच्छवाहा वंशाची थोरवी सिद्ध करण्याचा पुरावा तर हास्यास्पदच ठरतो. कच्छवाहा हें म्हणे सामवेदी रजपूत घराणें आणि भोसले हे यजुर्वेदी कुटुंब. वेद-भेदामुळें विवाह अनुलोम प्रतिलोम ठरत नाहींत, पण श्री. बेंद्रे यांनीं हा चंपा-संभाजी विवाह " अनुलोम " होईल असें म्हटलें. कच्छवाहांची माहिती देतांना तर " प्रवर कश्यप- यजुर्वेद, धनुर्वेद, वेद, सामवेद, उपवेद गांधर्व " अशी फोड केली आहे. यांत कमतरता आयुर्वेदाची तेवढी भासते ! सारांश काय, तर ज्ञातिभेदांचा, पोटजातिभेदांचा, ब्राह्मण्याचा ... क्षात्रकुलांचा असा विचार छत्रपति संभाजी राजांच्या [ स. १९६० मध्यें प्रसिद्ध झालेल्या ] चरित्रांत आल्याबद्दल आम्हांस अत्यंत वाईट वाटतें !

जादूटोणा करून पागेंतील मोतद्दारानें रामसेजचा किल्ला जिंकण्याचा प्रयत्न केला तो फसला, इत्यादि प्रकार काफीखानानें सांगितला. तोहि एखाद्या अंधश्रद्धीयाप्रमाणें ह्या चरित्रांत समाविष्ट केला आहे [ पृ. २३६ ]. शंभर तोळे वजनाचा सोन्याचा नाग, रेशमाचा चेंडू...हा सारा प्रकार हास्यास्पद आहे. तो सांगणारा काफीखान श्री. बेंद्रे यांच्या आदरास पात्र होतो. हीच माहिती बखरकारांनीं सांगितली असती तर त्यांजवर श्री. बेंद्रे यांनीं आग पाखडली असती !

छापखान्याचे ( किंवा मुद्रकाचे ) आणि ग्रंथकारांचे संबंध कसे असावे; मुद्रकाची जबाबदारी किती ... ... ... इत्यादि प्रश्नांचा विचार छत्रपति संभाजी चरित्राच्या निमित्तानें करतां येतो. कारण मुद्रकाचें कर्तव्य या छपाईंत नीट पार पडलेलें दिसत नाहीं. मराठीबाबत " शुद्ध-लेखना "ची, त्यांतील विविध पक्षांची सबब फार उपयोगी असली तरी कित्येक शब्द त्यांचें मुद्रण असें आहे कीं त्याबद्दल वाद नाहीं. शिवाय वाद किंवा मतभेद असले तरी कुठलीहि एक पद्धत मुद्रक-लेखक यांनीं मिळून ठरवावी आणि सुमारें ७०० पानांच्या या ग्रंथांत ती एकच असावी अशी आम्हां वाचकांची अपेक्षा. वाईसारख्या कृष्णाबाईच्या पवित्र तीरावरचा हा प्राज्ञ प्रेस. त्यांत संस्कृत शब्दांचीं शुद्ध स्वरूपें पारखण्यास, तीं शुद्ध स्वरूपांत छापण्यास अडचण पडूं नये. परंतु याबाबतींत मोठी निराशा पदरीं येते. " अंतर राजकीय " ( पृ. २०; २९ ) अंतर्बहिर ( पृ. ६६. ) अंतर बहिर ( पृ. १७२ ); अनुवंशिक ( पृ. २५० ) अधिपत्य ( पृ.



अनुक्रमणिका






३९१ ); अस्थित्व ( पृ. ४६३ ) हे शब्द शुद्ध असल्याचें किंवा रूढ असल्याचें तरी कुणीं सांगेल का ? अशौचाबद्दल अशुच ( पृ. १६० ) आशीर्वादाऐवजीं आशिर्वाद (पृ. ६६) जागरूकतेच्या ठिकाणीं जागृकता ( पृ. ८, ६० ) पाणिग्रहणाऐवजीं पाणिगृहण [पृ. ८२] परागंदा ऐवजी परागंधा [पृ. ६६२] राज्यक्रांति ऐवजीं राजक्रांति [ पृ. ४३५ ] हे पर्याय रास्त आहेत काय ? निर्मुलन [ पृ. ६४ ] चिंतातूर [ पृ. ७६ ] असुया [ पृ. १०३ ] तिन, तिनशें [ पृ. ३००-३०१; ३२६] जिभ [ पृ. ५८९ ] पिळ [ पृ. २७१ ] राशि [ पृ. ६७४, ६७७ ] सखि [ पृ. ६७७ ] ह्या शब्दांचें व्याकरणशुद्ध रूप ओळखणें कठिण नाहीं. संस्कृत शब्दांचा उपयोग करतांना ऋतुकाल [ पृ. ६७१ ] याचा रूढार्थ लक्षांत आलेला दिसत नाहीं. बंधुत्रय किंवा त्रिवर्गबंधु असा शुद्ध प्रयोग असता त्रयबंधू [ पृ. २० ] किंवा त्रयसिद्धी [ पृ. २४ ] हे शब्द राजरोसपणें ग्रंथराजांत वावरतांत ! अस्त्र व शस्त्र यांतील फरक लक्षांत न आल्यानें शस्त्रांऐवजीं सर्रास अस्त्र हा शब्द [ पृ. ३९६-९७; ४१७ ] वापरला आहे. विष्णुसुती [ पृ. १६० निद्रा या अर्थीं ] मान्य प्रयोग असल्याचें अधिकृत रीत्या समजलें तर बरें होईल. मथितार्थ [ पृ. ३०५ ] शुद्ध रीतीनें लिहिलेला असतां दोन ठिकाणीं [ पृ. ७१ व २३० ] अशुद्ध कां आढळावा ? विशाण [पृ. ३०२]; प्रस्तान [पृ.४०७] तीरसट [ पृ. २०२ ] इत्यादि मुद्रण पाहून एक संस्कृत कविवचन आठवतें — **न तथा बाधते शीतं यथा बाधति बाधते !**

संस्कृत शब्दांनाच हे हाल सहन करावे लागले असें नव्हे. "सलाह" हा फारसी शब्द; सलूख या अर्थी तो वापरतात. पण त्यावरून झालेला सल्ला हा मराठी शब्द सध्या वेगळ्या अर्थानें [ उपदेश, मत ] ह्या अर्थी वापरतांत. प्रस्तुत ग्रंथांत सल्ला हा शब्द सलूख म्हणून किती तरी ठिकाणी आला आहे. [ पृ. २५-२७;४९;५५१ ]. कोलोफोन याचा अर्थ ग्रंथ समाप्तीचें लेखन. हल्लींच्या पद्धतीनें मुखपृष्ठावर येते ती माहिती पूर्वी "कोलोफोन" मध्ये देत–असें जुन्या पोथ्या वाचणारे सांगतात. पण क्रोनोग्रॅम आणि कोलोफोन यांची गल्लत श्री. बेंद्रे यांच्या हातून घडलेली दिसते. एका वाक्यांत एकादी घटना सांगायची–पण लिहिण्याच्या प्रकारावरून त्या घटनेचा वर्षबोधहि व्हावा–ह्या लेखा–[ वाक्या ]चें नांव क्रानोग्रॅम [ पृ. ६१७ ]. फार्सी कागदपत्रांत 'बागी' हा शब्द बंडखोरांना उद्देशून पुष्कळ वेळां येतो. तो वाचतांना–लिहितांना त्याचीं यागी–वागी अशीं चुकीचीं रूपें होतात. श्री. बेंद्रे यांनीं [ पृ. १७३,१८६ वर ] तीं चुकीचीं रूपें तशींच ठेविलीं आहेत. बिला कुसूर [ = कसूर न करतां ] ऐवजीं हिला कुसूर [पृ. २६७], हा वाचण्याचा दोष आहे कां लिहिण्या–छापण्याचा ? तें कळत नाहीं.

संभाजी चरित्रांत लेखनदोषांचें एवढें वैपुल्य आहे कीं त्याबद्दल सारखी खंत वाटते. शुद्ध लिहिणें–शुद्ध छापणें दिवसेंदिवस कठिण–असाध्य–होत चाललेलें दिसतें. अशुद्ध प्रयोगाचे प्रकार असें आहेत.

शिवाजी व मोगलाना तह [ पृ. ७० ]
शहाअलम व संभाजीची भेट [ पृ. ७८ ]
हिंदू किंवा आर्यांचा हा राजा [ पृ. १६८ ]
स्वार व पायदळाची तुकडी [ पृ. २२५ ]
राजकारण व युद्ध कुशलतेबद्दल [ पृ. २४३ ]

–अशा प्रयोगांची पानोपानीं रेलचेल आहे. अशा लिहिण्यांत लेखकाचें कांहीं चुकलें याची जाणीव स्वतः लेखकास नसावी-मुद्रकांच्याहि लक्षांत हा दोष येऊं नये–हीच आमच्या शुद्ध लेखनाची दुर्दशा आहे !

अनेक ठिकाणीं शब्दरचना सदोष वाटते; अर्थ नीट समजत नाहीं. वाक्यांची रचनासुद्धां दूरान्वयी झाल्यानें - अर्थ कळून घेण्यासाठीं सायास पडतात. यावरून लिहिणें सुबोध तर नाहींच; पण अनेक ठिकाणीं दुर्बोध झालें आहे.

"आधींपासून निजामशाहीचा मत्सर करणाऱ्या मोगल बादशहाची इब्राहिम आदिलशहानें मदत मागितली ( पृ. ९ ) ( मोगलबादशहा हा मत्सर करणारा नव्हे - आदिलशहा मत्सर करणारा आहे ).

"सोयराबाईला मल्हाररामराव हा एकटाच लेखक भिंतीत चिणून मारली असें लिहितो." ( पृ. १४१ )







"संभाजीराजाला सोयराबाईनें शिवाजीमहाराजांत मारलें या कंडींत फारसें तथ्य वाटलें नसावें (पृ. १४७)

"संभाजीराजांनीं शिवछत्रपतींच्या कारकिर्दीत घालून दिलेले नियम कटाक्षानें पाळले. (पृ. २५४).

"मनुची एका पर्शियाहून आलेल्या मिशनरीची गोष्ट सांगतो." [पृ. ३३२]

"मद्रासकर हरजीनें आपल्या मुख्य ठाण्याचा जो बदल केला त्याबद्दल लिहितात. [पृ. ५३५]

हीं छोटीं छोटीं वाक्यें मुद्दाम निवडलीं. मोठीं वाक्यें, असा दूरान्वय, शब्दांचे वेगळे अर्थ असा संयोग जुळून आल्यावर वाचकांचे हाल किती होत असतील कल्पनाच करावी ! कित्येक वेळां छेदक सहज तुटत असतांहि तोडले नाहींत. दोन दोन, तीन तीन पानें सलंग मजकूर धावत आहे. हें सर्व मुद्दाम सांगितलें. पुस्तकाची छपाई, जाड्या ग्रंथराजाचें मुद्रण यापेक्षां अधिक काळजीपूर्वक झालें पाहिजे. मुद्रक व लेखक यांनीं मुद्दाम लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं ही सर्व मेहनत [लेखन–मुद्रण] वाचकांसाठीं करावयाची. वाचकांची सोय जितकी अधिक करावी–तितके अधिक वाचक त्या ग्रंथाला लाभतील. संभाजीसंबंधी अनेक गैरसमज दूर करणारें पुस्तक – त्याच्या नांवाचा हा चरित्र ग्रंथ – अगदीं वेगळ्या पद्धतीनें, निराळ्या शैलीनें, लिहावयास हवा होता. कारण आम्हांस ह्या ग्रंथराजांत संभाजीचें चित्र छान दिसलें. चरित्र मात्र हुडकून हुडकून आम्हीं थकलों ! आम्ही हरलों असें हवें तर म्हणा.

अनेक वर्षांच्या जुन्या अभ्यासकानें केलेली ही प्रचंड कामगिरी वास्तविक कौतुकाचा विषय होय. श्री. बेंद्रे यांचा स्नेहहि असा जुना आणि कौतुकास्पद आहे. मुंबईस आले कीं मुद्दाम भेट घेऊन आपल्या नित्य नव्या संशोधनांतील प्रगतीचा 'रपोट' मला दिल्याशिवाय ते रहात नाहींत. पुस्तक छापून झालें कीं एक प्रत मजकडे हटकून येते. अशा प्रेमळ संशोधक मित्राच्या ग्रंथराजाचें परीक्षण करण्याचा हा मान म्हटला पाहिजे. प्राज्ञ पाठशाळा मंडळातर्फे जो चरित्र-राज प्रसिद्ध झाला, त्याचें परीक्षण देखील त्याच मंडळ–प्रकाशनांत–"नवभारतांत" व्हावें हाहि एक विशेष योग होय. प्राज्ञप्रेसबद्दल टीका संपादकांनीं आणि मुद्रकांनीं ज्या उदार वृत्तीनें छापली–छापण्याचें पत्करलें, त्याच उदार वृत्तीनें श्री. बेंद्रे माझ्या स्पष्टोक्तीकडे पहातील अशी खात्री वाटते.

---

प्रा. के. एफ्. चोरडिया

# प्राकृत भाषा व साहित्य

"णवमत्थ दंसणं संनिवेस सिसिराओ बंध रिद्धीओ।
अविरलमणिमो आभुवन बंधमिह णवर पयमक्ति ॥"

"सृष्टीच्या प्रारंभापासून आजपर्यंत अभिनव आशय, समृद्ध रचना आणि मृदु शब्दमाधुर्य या बाबतींत प्राकृत सर्व भाषांत श्रेष्ठ आहे." अशा शब्दांत प्राकृत भाषेचा गौरव 'गऊडवहो' ह्या प्राकृत महाकाव्याचा कवि 'वाक्पतिराज' ह्यानें केला आहे. कवि पुढे म्हणतो —

"जल हें सागरापासून निर्माण होतें व तें सागरांतच विलीन होतें. त्याप्रमाणे सर्व भाषा प्राकृतांतून निर्माण होतात व प्राकृतांतच विलीन होतात. प्राकृतापासून अंतःकरणाला अनिर्वचनीय आनंद होतो; आनंदानें नेत्र विकसित होतात व तृप्तीनें मुकुलितहि होतात."

परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, प्राकृत भाषेकडे व प्राकृतांतील विपुल साहित्यसंपदेकडे फारशा विद्वानांचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. विशेषतः मराठी भाषेंत तर प्राकृत साहित्यावरील लेख किंवा ग्रंथ क्वचितच आढळतात. इसवी सनाच्या पहिल्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंत प्राकृत भाषेंत साहित्यनिर्मिति होत होती. त्यानंतरहि अठराव्या शतकापर्यंत मधून मधून प्राकृत भाषेंत काव्य व नाटकें लिहिलीं गेलीं परंतु इतकी दीर्घ परंपरा असलेल्या साहित्याची माहिती आज मात्र बऱ्याच जणांना नाहीं. कांहीं लोकांना प्राकृत ही फक्त जैनांच्या धर्मग्रंथांची भाषा आहे असें वाटतें परंतु जैनांच्या धर्मग्रंथाशिवाय इतरहि ललित व मधुर साहित्य प्राकृतांत आहे याची त्यांना कल्पना नाहीं. उलटपक्षीं प्राकृतांतील विपुल कथा साहित्य व त्यांतील माधुर्य पाहून 'जयवल्लभ' कवि म्हणतो —

"ललिए महुरक्खरए जुवई-यण वल्लहे स सिंगारे।
संते पाइय कव्वे को सक्कइ सक्कयं पढिऊं?"

"लालित्यपूर्ण, मधुर, युवतींना प्रिय असलेलें व शृंगाररसयुक्त प्राकृत काव्य उपलब्ध असल्यावर संस्कृत कोण वाचणार? प्राकृत कवि तर प्राकृत काव्याची स्तुति करतीलच परंतु दहाव्या शतकांतील 'काव्य-मीमांसा' ह्या काव्यशास्त्रावरील प्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचा कर्ता 'राजशेखर' म्हणतो--

"परुस सक्कअ बंधो पाऊअ बंधोत्ति होइ सुउमारो।
पुरिस महिलाणं जेत्तिअमिहंतरं तेत्तिअमिमाणं ॥"

"संस्कृत भाषा कर्कश तर प्राकृत सुकुमार आहे. राकट पुरुष व नाजुक स्त्रींत जेवढें अंतर असतें तेवढें या दोन भाषांत आहे."

## प्राकृतचें मूळ

प्राकृत शब्दाची व्युत्पत्ति प्रकृति या शब्दापासून झाली आहे. प्रकृतीचा अर्थ मूळ. कांहीं विद्वानांच्या मताप्रमाणे संस्कृत पासून प्राकृत भाषेची उत्पत्ति झाली परंतु दुसऱ्या कांहीं विद्वानांना हें मत चुकीचें वाटतें. प्राकृतावर संस्कार होऊन जी भाषा बनली ती संस्कृत असें ह्यांचें मत आहे. संस्कृतचे प्राध्यापक डॉ. डी. व्ही. गर्गे म्हणतात "लोकांच्या व्यवहारांत नेहमी चालत आलेल्या अशा या भाषा होत; आणि त्या दृष्टीनें त्या प्राकृत म्हणजे स्वाभाविक अशा निश्चितच आहेत. या प्राकृत भाषांचें मूळ संस्कृत म्हणजे पाणिनीय संस्कृत होय हें म्हणणें विद्वानांना मान्य होण्यासारखें नाहीं." "प्राकृत और उसका साहित्य' ग्रंथाचे कर्ते डॉ. हरदेव बाहरी म्हणतात "संस्कृतपासून प्राकृत बनली हें मत भाषाशास्त्रीय दृष्टीनें असंगत, अप्रामाणिक आणि चुकीचें आहे. संस्कृत शब्द प्रथमतः पाणिनीच्या व्याकरणांत आढळतो. त्यापूर्वीं या शब्दाचा प्रयोग आढळत नाहीं. नंतरच्या संस्कृतपेक्षा वेदाची भाषा प्राकृतला अधिक जवळ आहे." 'पिशल' ह्या जगद्विख्यात जर्मन पंडिताच्या प्राकृतावरील व्याकरणाचा अनुवाद करतांना डॉ. हेमचंद्र जोशी म्हणतात "प्राकृतचें मूळ संस्कृत हें मत भ्रमपूर्ण आहे व तसें असणें शक्यच नाही. हिंदी व इतर आधुनिक भाषांचा आधार केवळ संस्कृतच नाही. हिंदींतील अनेक शब्द प्राकृत व अपभ्रंश भाषामुळे वैदिक भाषे-








पासून आलेले आहेत." असेंच मत इतरहि कांही विद्वानांनी व्यक्त केलें आहे.

### प्राकृत साहित्याचा काळ

प्राकृत भाषेंतील साहित्याचा काळ प्रामुख्यानें इसवी सनाच्या सुरुवातीपासून इ. स. ६०० पर्यंतचा आहे. त्यापूर्वी गौतमबुद्धाच्या वेळेपासून म्हणजे इ. सनापूर्वी ५०० पासून, इसवी सनाच्या सुरुवातीपर्यंत पालीचा प्रभाव होता. इ. स. ६०० नंतर ११०० पर्यंत अपभ्रंश साहित्याची निर्मिति होत होती. अर्थात या सर्व काळांत संस्कृत साहित्यनिर्मिति होत होतीच. इतकेंच नव्हे तर पांडित्यप्रदर्शनासाठीं संस्कृतमध्येंच ग्रंथरचना करणें आवश्यक झालें होतें. तथापि संस्कृतबरोबर पाली, प्राकृत व अपभ्रंश ह्या भाषांतील साहित्याचाहि खूप विस्तार झाला. इ. स. ६०० नंतरहि प्राकृतमध्यें ग्रंथरचना होतच होती परंतु त्याचा मुख्य जोर ६०० वर्षेपर्यंतच होता.

प्राकृतमध्ये महाराष्ट्री, शौरसेनी, अर्धमागधी, पैशाची इत्यादि भाषांचा अंतर्भाव होतो. ह्या सर्व प्राकृतच्या उपभाषा आहेत. विद्वानामध्यें प्राकृत उपभाषांच्या संख्येबद्दल मतभेद आहेत. भरत मुनींनी नाट्यशास्त्रांत सात प्राकृत भाषांचा उल्लेख केला आहे तर साहित्यदर्पणकार ही संख्या १२ दर्शवितात. तथापि सर्वसामान्यपणें अर्धमागधी, महाराष्ट्री, शौरसेनी व पैशाची ह्या चार प्राकृत भाषा मुख्य गणल्या जातात.

'महाराष्ट्री' प्राकृताचें वर्णन अनेक व्याकरणकारांनीं केलेलें आहे. दंडी तिच्यासंबंधी म्हणतो, "महाराष्ट्राश्रयां भाषां प्राकृष्टं प्राकृतं विदुः" 'महाराष्ट्री सर्वोत्कृष्ट प्राकृत आहे.' ८० टक्के प्राकृतांतील साहित्य महाराष्ट्री भाषेंत लिहिलें गेलें आहे. 'सेतुबंध,' 'गाथासप्तशती' 'वज्जालग्गं,' 'रावणवहो,' 'गऊडवहो,' 'कुमारपालचरित' इत्यादि महत्त्वाचीं काव्यें महाराष्ट्रींत आहेत. महाराष्ट्री ही सध्याच्या महाराष्ट्र राज्याची पूर्वीची भाषा. मराठी व गुजराती भाषा हिच्यापासून निर्माण झाल्या.

महाराष्ट्री ही ललित काव्याची तर अर्धमागधी ही जैनांच्या धार्मिक ग्रंथांची भाषा आहे. जैनांच्या धर्मग्रंथांना आगम म्हणतात. आगमांत ४५ धर्मग्रंथांचा समावेश होतो. हे सर्व ग्रंथ अर्धमागधींत आहेत. मगध राज्याच्या अर्ध्या भागांत बोलली जाणारी ती अर्धमागधी. भगवान महावीरांनीं जैन धर्माचा प्रचार प्रथमतः ह्याच भागांत केला. ते आपला उपदेश लोकभाषेंत करीत म्हणून धर्मग्रंथहि ह्याच भाषेंत रचले गेले.

कृष्णाचें गोकुळ व मथुरेच्या भोवतालच्या प्रदेशाची भाषा शौरसेनी होती. प्राकृतांत शौरसेनी ही सर्वांत प्राचीन मानली जाते. हिंदीतील ब्रज भाषा, खडी बोली ह्यांचा विकास ह्याच भाषेपासून झाला. शौरसेनी भाषेंत विपुल साहित्यनिर्मिति झाली असावी परंतु आज मात्र तें साहित्य उपलब्ध नाहीं. मुसलमानांच्या आक्रमणामुळें मध्यप्रदेशांतील बरेंच साहित्य नष्ट झालें. मुसलमान राज्यकर्ते फक्त भारतावर स्वाऱ्या करून स्वस्थ बसले नाहीत. त्यांना हिंदू संस्कृति नष्ट करावयाची होती व त्यामुळे त्यांनी अनेक मूर्ति फोडल्या व ग्रंथ संग्रहालयें पेटवून दिलीं. नालंदाचें विश्वविद्यालय असेंच अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडलें. तेथील ग्रंथसंग्रहालय इतकें प्रचंड होतें कीं, त्याची आग कितीतरी दिवस धुमसत होती, ह्यामुळें आज शौरसेनीचें फारसें साहित्य मिळत नाहीं. नाटकांतून तिचा उपयोग आढळून येतो. जैनांच्या दिगंबर संप्रदायाचे धार्मिक ग्रंथ शौरसेनींत आहेत.

पैशाची ही बलुचिस्तान, काश्मीर, पंजाब ह्या भागांत बोलली जात असे. आजहि तेथील भाषावर पैशाचीची छाप दिसते. पैशाचीचें साहित्य मात्र आज उपलब्ध नाहीं. गुणाढ्याची प्रसिद्ध बृहत्कथा ही मुळांत पैशाचीमध्ये होती. आज मूळ ग्रंथाऐवजी त्याचें संक्षिप्त संस्कृत रूपांतर उपलब्ध आहे.

### प्राकृत साहित्याचे प्रकार

हे प्राकृतांतील भाषादृष्टीने प्रमुख भेद झाले. त्यांत साहित्य दृष्टिनेंहि भेद आहेत. प्राकृत साहित्याची मुख्यतः तीन भागांत विभागणी करतां येते (१) जैनांचे धर्मग्रंथ आगम (२) आगमेतर जैन साहित्य (३) इतर साहित्य. यांतील सर्वांत प्राचीन भाग आगम ग्रंथ होत. भगवान महावीरापूर्वीच्या तेवीस तीर्थंकरांनी दिलेला उपदेश चौदा पूर्व ग्रंथांत समाविष्ट होता. हें पूर्व ग्रंथांतील साहित्य खूप विशाल होतें. महावीर हे चोवीसावे तीर्थंकर. त्यांनी त्यावर खूप



अनुक्रमणिका






मनन केलें व लोकांना तो उपदेश अतिशय सोप्या भाषेंत विशद केला. धर्माचीं तत्त्वें फक्त विद्वानासच न कळतां सर्वांना कळावी. त्या ज्ञानगंगेचें पवित्र पाणी कुणीहि प्यावें अशी त्यांची इच्छा होती. लोकांना संस्कृत भाषेंत सांगितलें तर कळणार नाहीं हें पाहून त्यावेळच्या लोकभाषेंत अर्धमागधींत त्यांनीं उपदेश केला. हा उपदेश त्यांच्या शिष्यांनीं कंठस्थ केला व हें साहित्य मौखिक परंपरेनें पुढें चालत आलें. धार्मिक सूत्रांत कानामात्रेचा फरक करणें म्हणजे मानवहत्येचें पातक मानलें जाई. या पापाच्या भीतीनें शिष्यवर्ग हीं सूत्रें पाठ करण्याकडे अतिशय लक्ष देत. त्यामुळें हीं धर्मसूत्रें मुळांत फरक न होतां तशींच पुढें चालत आलीं.

भगवान महावीर सतत तीस वर्षें धर्मप्रचार करीत भारताच्या निरनिराळ्या भागांत फिरले व वयाच्या ७२ व्या वर्षीं इ. सनापूर्वी ५२७ सालीं पावापुरी येथें निर्वाण पावले. त्यांच्या निर्वाणानंतर पांचवे गणधर मुख्य आचार्य बनले व त्यांच्यानंतर क्रमशः ज्येष्ठ व श्रेष्ठ आचार्यांना हा मान मिळत गेला. त्यांच्या नेतृत्वाखालीं जैन धर्मप्रचाराचें व धर्मअध्ययनाचें कार्य चालत असे. परंतु महावीरांच्या निर्वाणानंतर सुमारें २०० वर्षांनीं एक अशी घटना घडली कीं, ज्यामुळें ही व्यवस्था नीट चालेनाशी झाली.

त्यावेळीं उत्तर भारतांत मौर्य सम्राट चंद्रगुप्ताचें राज्य होतें. चंद्रगुप्ताच्या उत्तर राज्यकालांत मगध प्रांतांत भयंकर दुष्काळ पडला. पाऊस पडेना, माणसांना अन्न मिळेना; जनावरांना चारा नाहीं कीं पाणी नाहीं. माणसें व जनावरें तडफडून मरूं लागलीं. १-२ वर्षें झालीं तरी दुष्काळ कांहीं संपेना. आभाळांत ढग दिसेना. लोकांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वहात पण पावसाची धार कांहीं पडेना. तेव्हां आपल्या व्रतांचें पालन करतां यावें म्हणून साधूंचा एक जथा आचार्य भद्रबाहूंच्या नेतृत्वाखाली दक्षिणेंत कर्नाटक प्रांतीं आला. बाकीचे साधु स्थूलिभद्रांच्या नेतृत्वाखाली तेथेंच राहिले.

दुष्काळाच्या काळांतहि साधूंचें अध्ययन चालू होतें परंतु साधूंची पांगापांग झाल्यानें कांहीं पाठांचा विसर पडला होता. तेव्हां दुष्काळ संपल्यानंतर मगधांत असलेल्या सर्व साधूंची एक परिषद पाटलीपुत्र येथें आचार्य स्थूलिभद्रांच्या नेतृत्वाखाली बोलावण्यांत आली. येथें ११ अंगग्रंथांचें संकलन करण्यांत आलें. १२ व्या 'दृष्टिवाद' अंगग्रंथाचाहि अभ्यास करण्यांत आला परंतु पुढें तो ग्रंथ लुप्त झाला.

मगधांतला दुष्काळ सतत १२ वर्षें टिकला. ह्या १२ वर्षांच्या काळांत उत्तरेकडे राहिलेल्या साधूंच्या व्रतांत कांही परिवर्तन झालें. अचेलक अवस्थेंत विहार करण्याऐवजी ते दोन श्वेत वस्त्रें परिधान करूं लागले. दुष्काळानंतर दक्षिणेकडील साधु पुन्हा उत्तरेस आले. त्यांना आपल्या बांधवांचें वस्त्रधारण आवडलें नाहीं. त्यांनीं पाटलीपुत्र येथील परिषदेंत संकलन केलेल्या धर्मग्रंथांनाहि मान्यता देण्याचें नाकारलें. येथपासून जैनामध्यें श्वेतांबर व दिगंबर हे दोन पंथ पडले.

यानंतर जैन साधूंची दुसरी परिषद मथुरा येथें श्री. स्कंदिलाचार्यांच्या अध्यक्षतेखालीं भरून आगम ग्रंथांच्या शुद्ध पाठांचें पुन्हा संकलन करण्यांत आलें. कांही वर्षांनंतर देवर्धिगणींच्या अध्यक्षतेखालीं तिसरी परिषद काठेवाडांत वल्लभीपूर येथे भरली. या वेळीं सर्व ग्रंथांची व्यवस्थित रचना करून त्यांच्या शेकडों प्रति लिहून काढण्यांत आल्या व त्या सुरक्षित राहण्यासाठीं मोठमोठ्या शहरीं ग्रंथभांडारांत ठेवण्यांत आल्या.

वल्लभीपूर येथील परिषदेंत एकूण ८४ ग्रंथांचें संपादन करण्यांत आलें. परिषदचे अध्यक्ष देवर्धिगणि यांनी 'नंदीसूत्र' नांवाच्या ग्रंथाची रचना केली. त्यांत या ८४ ग्रंथांची यादी दिली आहे. आज मात्र त्यांतील ४५ ग्रंथच उपलब्ध आहेत. श्वेतांबर मूर्तिपूजक जैन ह्यांना प्रमाणभूत मानतात. स्थानकवासी जैनांना ह्यांतील ३२ ग्रंथच मान्य आहेत.

हे धर्मग्रंथ धर्मपुरुषांचें महत्त्वाचें अंग आहे म्हणून ह्या ग्रंथांची विभागणी अंग, उपांग, प्रकीर्णक, छेदसूत्र, मूलसूत्र, चुलीका अशा विभागांत केली आहे. अंगग्रंथ ११ आहेत तर उपांगें १२ आहेत. ६ ग्रंथांना छेदसूत्रें अशी संज्ञा आहे तर ४ ग्रंथांना मूलसूत्रें असें म्हणतात. १० प्रकीर्णक ग्रंथ आहेत व २ चूलीका सूत्रें मिळून एकूण ४५ ग्रंथ आहेत. श्वेतांबर जैनांच्या या ग्रंथाप्रमाणेंच रयणसार, पवयणसार, समयसार इत्यादि दिगंबरांचे धर्मग्रंथ आहेत.

धर्मग्रंथ हा प्राकृत साहित्याचा एक भाग आहे. त्याशिवाय कुवलयमाला, उपएसमाला, धर्मोपदेशमाला, कुमारपालप्रतिबोध हें उपदेशपर कथासाहित्य तर समराइच्च कहा, धूतरिख्यान, कथाकोश प्रकरण, कथा-महोदधि, विजयचंद्र चरित, ज्ञानपंचमी कथा इत्यादि मनोरंजक कथा आहेत. प्राकृतांत ललित कादंबऱ्या देखील आहेत. ह्यांतील बऱ्याच कादंबऱ्यांत अनेक अद्‌भुत घटना आहेत. मानवस्वभावाचे अनेकविध नमुने येथे आपणास आढळतात. ह्या कादंबऱ्यांत तरंगवती, सुरसुंदरी चरिअं, कालकाचार्य कथानक, भुवन-सुंदरी, मलयसुंदरी कथा, श्रीपाल कथा, रयणसेहर कथा या प्रमुख आहेत. कथाकादंबऱ्याप्रमाणेंच चरित्र ग्रंथाचीहि प्राकृतांत उणीव नाहीं. यामध्यें 'पउमचरिय' ही जैन रामायणाची कथा आहे. शलाकापुरुष चरितांत जैन धर्मांतील ५४ महापुरुषांचीं जीवनचरित्रें आहेत. याच ग्रंथावर आधारलेला ६३ महापुरुषांचीं चरित्रें वर्णन करणारा ग्रंथ नंतर अपभ्रंशांत निर्माण झाला. याशिवाय महावीर चरित, सुपास्सनाह चरित, सुमतिनाथ चरित इत्यादि ग्रंथांतून तीर्थंकरांचीं चरित्रें आहेत. कुमारपालचरित्र हा गुजरातचा राजा कुमारपाळाच्या चरित्रावरील ग्रंथ तर कुम्मापुत्तचरित्रांत कुम्मा राणीचा पुत्र धर्मदवाची जीवनगाथा आहे.

वर दिलेल्या सर्व ग्रंथांची निर्मिति जैन साधूंनीं केली. त्यामुळें जीवनाच्या निरनिराळ्या प्रवाहाचें चित्रण रेखाटतांना मधून मधून धर्माचा उपदेश, धर्माचें तत्त्वज्ञान त्यांत आलें आहे. जैनेतर लेखकांनीं व कवींनीं निर्माण केलेल्या साहित्यांत मात्र धर्माचा फारसा संबंध नाहीं. जैनेतर लेखकांनी केवळ साहित्यगुणाकडेच लक्ष दिल्यानें उत्कृष्ट साहित्याचें दर्शन त्यांत होतें. या काव्यांत 'गाथासप्तशती' हें श्रेष्ठ काव्य आहे. जगांतील श्रेष्ठ काव्यांत याची गणना केली जाते. वज्जालग्गं ह्या काव्यांत निरनिराळ्या विषयावर नीतिपर गाथा आहेत. विषमबाणलीला व मदनमुकुट हीं शृंगारिक काव्यें आहेत. हीं स्फुटकाव्यें झालीं. स्फुटकाव्याप्रमाणेंच प्राकृतांत प्रबंधकाव्येंहि भरपूर आहेत. सेतुबंध हें प्राकृतांतील सर्वोत्कृष्ट महाकाव्य. ह्याची कथा रामायणा-





अनुक्रमणिका








वर आधारलेली आहे परंतु त्यांतील कल्पनाविलास कवीचा स्वतःचा आहे. लीलावती ही एक अद्भुत प्रेमकथा आहे. सोरिचरित्त, उसानिरुद्धं व कंसवहो हीं काव्यें भागवतावर आधारलेलीं आहेत.

काव्याप्रमाणेंच प्राकृतांत नाटकेंहि आहेत. प्राकृतांतील नाटकांना सट्टक अशी संज्ञा आहे. सध्या कर्पूरमंजरी, रंभामंजरी, चंद्रलेखा, शृंगारमंजरी व आनंदसुंदरी एवढीं सट्टकें उपलब्ध आहेत. सट्टकांचें कथानक राजघराण्यांतील प्रेमकथावर आधारलेलें आहे. यांतील कर्पूरमंजरी हें सट्टक प्रसिद्ध साहित्यकार राजशेखरानें लिहिलें आहे. याशिवाय विलासवती, लीलावती ही एकांकी नाटकें आहेत. त्यांना वीथी या नांवानें संबोधण्यांत येतें. प्राकृतांत स्वतंत्र नाटकें आहेत त्याप्रमाणेंच संस्कृत नाटकांतून प्राकृतचा उपयोग ठायीं ठायीं केलेला आहे. नाटकांतील सर्व सामान्य पात्रें प्राकृतांतूनच बोलतात. संस्कृत फक्त श्रेष्ठ घराण्यांतील व्यक्ति किंवा विद्वानासाठी राखून ठेवलेली आढळते. कालीदासाचीं शाकुंतल, मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय हीं नाटकें तर मगध सम्राट हर्षवर्धनाची प्रियदर्शिका, रत्नावली, नागानंद हीं नाटकें, भासाचीं अविमारक, चारुदत्त तसेच शूद्रकाचें मृच्छकटीक या सर्व नाटकांतून अनेक पात्रें प्राकृतांतूनच बोलतात. केव्हा केव्हा तर संस्कृतपेक्षा प्राकृतच प्रधान भाषा वाटूं लागते.

हें ललितसाहित्याविषयीं झालें. शास्त्रीय विषयावरहि प्राकृतांत ग्रंथ आहेत. भाषाशास्त्र, भौतिकविज्ञान, भूगोल, गणित, ज्योतिषशास्त्र यावर प्राकृतांत ग्रंथ आढळतात.

## बहुजनसमाजाची भाषा

अशाप्रकारें प्राकृतांत विपुल साहित्यराशी असूनहि विद्वानांचें तिकडे लक्ष गेलें नाही. हें उथळ पाण्याचें डबकें आहे असें अनुमान करून प्राकृत साहित्य सागराचें अवगाहन कोणी करीत नाही. ही कोळशाची खाण आहे अशी केवळ कल्पना करून घेतल्यामुळें प्राकृतांतील रत्नराशीला आम्ही मुकलों आहोत. अजूनहि जेसलमीर, पाटण, अहमदाबाद येथील जैन भांडारांतून हजारों प्राकृत हस्तलिखित ग्रंथ पडलेले आहेत परंतु त्यांचें संशोधन कोणी केलेलें नाही; मग ते छापून त्यांचा आधुनिक भाषांत अनुवाद करणें तर दूरच राहिलें. प्राकृत साहित्याच्या या उपेक्षेबद्दल तक्रार करतांना प्रा. श्री. ना. बनहट्टी म्हणतात — " आमच्या शाळांतून काय किंवा विद्यालयांतून काय किंवा पाठशाळांमधून काय, संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास भरघोस रीतीने चालू असतो. त्याबद्दल तक्रार नाहीं. प्राकृत वाङ्मयाच्या अभ्यासाची जी उपेक्षा चालू आहे, ती आमच्या एकांगीपणाचें, रूढिदास्याचें निदर्शक आहे. एवढेंच मला सुचवावयाचें आहे. प्राकृतांतील काव्य भाषा, समाजजीवन आणि इतिहास या तिन्ही दृष्टींनीं संस्कृताइतकेंच किंबहुना अधिकच अभ्यसनीय आहे, ही गोष्ट आमच्या विद्यापीठांनीं व उच्च शिक्षणाच्या चालकांनीं लक्षांत घेतली पाहिजे. "

प्राकृत ही नेहमीच बहुजनसमाजाची भाषा होती. त्यामुळें प्राकृत साहित्य सामान्य जनतेच्या जीवनांतून निर्माण झालें. ' गाथासप्तशतीचे संपादक श्री. रा. आ. जोगळेकर म्हणतात " संस्कृत ही अल्पसंख्य आर्यांची भाषा. ती बहुजनसमाजाची भाषा कधींहि नव्हती; एवढेंच नव्हे तर धार्मिक कृत्यासाठी संस्कृतचा उपयोग करणाऱ्या आर्यांचे घरगुती सामान्य व्यवहार प्राकृतांतूनच होत असत, असें अनुमान करण्यास जागा आहे. तसें नसतें तर यज्ञदीक्षा पुरी होईपर्यंत प्राकृत बोलतां कामा नये असा दंडक सूत्रकारांनी घातला नसता. " अशाप्रकारें बहुजनसमाजाची भाषा असल्याने प्राकृतांत प्राचीन समाजव्यवस्थेचें चित्रण आढळून येतें. प्रदीर्घ काळपर्यंत तिचें अस्तित्व असल्याने समाजशास्त्र व इतिहासाच्या अभ्यासाच्या दृष्टीनेहि तिचें महत्त्व आहे.

भाषाशास्त्रांत तर प्राकृत महत्त्वाचा दुवा आहे. जुन्या वैदिक काळांतील भाषेशीं व संस्कृतशीं तिचें सांनिध्य आहेच. परंतु याशिवाय भारतांतील आर्यपरिवारांतील आधुनिक भाषांशीं तिचा निकटचा संबंध आहे. मराठी व गुजराती भाषेची आई महाराष्ट्री आहे तर हिंदी शौरसेनीची कन्या आहे. सिंधी, पंजाबी, बलोची ह्या भाषांचा पैशाचीशीं संबंध आहे. ह्यामुळें भाषाशास्त्राच्या दृष्टीने तर ह्या भाषेचें फार महत्त्व आहे.

अशा तऱ्हेने भाषाशास्त्र, समाजशास्त्र, साहित्य/धर्म या सर्व दृष्टींनी प्राकृत भाषा व साहित्य यांचें महत्त्व असून वरील शास्त्रांच्या अभ्यासकास त्यांचा परिचय असणें आवश्यक आहे.

डॉ. ना. र. इनामदार

# फ्रान्समधील लष्करी सत्ता व लोकसत्ता यांमधील झगडा

[ हा लेख ' Foreign Affairs ' या अमेरिकन त्रैमासिकाच्या जानेवारी १९६१ च्या अंकांत आला असून त्याचा लेखक जान-मेरी डोमेनाख आहे. लेखाची पार्श्वभूमि अशी : मे १९५८ मध्यें फ्रेंच सरकारच्या अल्जीरियाविषयींच्या धोरणासंबंधी फ्रेंच सरकारशीं अल्जीरियांतील फ्रेंच वसाहतवाल्यांचे मतभेद झाले, फ्रेंच लष्कर मध्यस्थी पडलें व द गॉल अधिकारावर आला. द गॉलच्या प्रेरणेनें चौथ्या प्रजासत्ताकाच्या अवशेषांवर पाचव्या प्रजासत्ताकाची उभारणी झाली; अध्यक्ष द गॉलला नवीन घटनेनें जास्त अधिकार प्राप्त झाले. जानेवारी १९६० मध्यें अल्जीरियांतील फ्रेंच वसाहतवाल्यांनीं द गॉलविरुद्ध झगडा पुकारला पण सैन्यानें तटस्थता स्वीकारल्यामुळें वसाहतवाल्यांना यश मिळालें नाहीं. त्यानंतर अल्जीरियाविषयक आपलें स्वायत्ततेचें धोरण यशस्वी होण्याच्या दृष्टीनें द गॉलनें अल्जीरियांतील कारभारयंत्रणेवर आपली पकड घट्ट करावयास सुरुवात केली. डिसेंबर १९६० मध्यें द गॉलच्या अल्जीरियाच्या भेटीच्या प्रसंगीं वसाहतवाल्यांनीं विरुद्ध निदर्शनें केलीं, अरबांनींहि त्याला प्रत्युत्तर म्हणून निदर्शनें केलीं; बराच रक्तपात झाला. जानेवारी १९६१ मध्यें द गॉलच्या अल्जीरियाविषयक धोरणावर जनमत घेण्यांत आलें, त्यांत द गॉलच्या धोरणाला बहुमताचा पाठिंबा मिळाला. फ्रान्सशीं एकत्रीकरण [ integration ] हा पर्याय अल्जीरियन अरबांना मान्य नाहीं, अरबांना विभक्त [ secession ] व्हावयाचें आहे पण देशाची फाळणी होऊं न देतां. द गॉलनें स्वायत्ततेचा पर्याय फ्रेंच जनतेपुढें ठेवला, त्याला फ्रान्समध्यें पाठिंबा मिळाला आहे. आतां हा पर्याय अरब जनता व वसाहतवाले यांच्या गळीं कसा उतरावयाचा हा द गॉलपुढें प्रश्न आहे. फ्रेंच लष्करी सत्तेचा यासंबंधीं काय दृष्टिकोन आहे यावर या प्रश्नाचें उत्तर कांहीं अंशीं अवलंबून राहील. त्या दृष्टिकोनावर या लेखानें प्रकाश पडेल. – लेखक ]

जनरल बोनापार्ट, मार्शल पेटॉं किंवा १९४४ मध्यें जनरल द गॉल यांपैकी कोणींहि सैन्याच्या बळावर सत्ता हस्तगत केली नाहीं. पूर्वीं ज्या प्रसंगीं लष्करी प्रमुखांनीं सरकारशीं दोन हात केले त्या वेळीं त्यांनीं सरतेशेवटीं सरकारपुढें शरणागति पत्करली. मे १९५८ मध्यें अल्जीरियांतील जनरल व कर्नल यांनीं पुकारलेलें बंड ही अगदीं नवीन घटना होती. ती घटना अपवादात्मक राहाणार आहे कां लष्करानें फ्रान्सचें भवितव्य आपल्या हातांत घेतलें आहे ? फ्रेंच लष्कर प्रत्यक्ष वा हस्तकांकरवीं अप्रत्यक्ष रीत्या राजसत्तेवर प्रभुत्व गाजवणार आहे काय ? फ्रान्सचें भवितव्य या प्रश्नाच्या उत्तरावर अवलंबून आहे. फ्रेंच लष्करानें कां व कसा राजकारणांत हस्तक्षेप करावयास सुरुवात केली हें समजावून घेणें यासाठीं अगत्याचें होईल.

### इण्डोचीनमध्यें फ्रेंच लष्कर

१९४४–४५ मध्यें महायुद्धामध्यें विजयश्री मिळवल्यावर सैन्यांत ऐक्याची भावना निर्माण झाली. ताबडतोब इण्डोचीनमध्यें त्याची रवानगी करण्यांत आली. तिथें फ्रेंच लष्कराला रोमांचकारी अनुभव प्राप्त झाला. ज्यावेळीं बहुसंख्य फ्रेंच जनता जर्मन वर्चस्वाचें दुःख विसरण्याचाच केवळ प्रयत्न करीत होती, त्यावेळीं फ्रेंच लष्कर एका नवीन प्रकारच्या अवघड लढाईंत गुंतलें होतें. या सात वर्षांमध्यें मायदेशापासून हजारों मैल दूर असतांना लष्कराची विशिष्ट मनोवृत्ति बनली, एका तत्त्वज्ञानानें त्यांच्या मनांत घर केलें. तत्त्वज्ञानानें भारलेल्या शत्रूशीं फ्रेंच लष्कराला सामना द्यावा लागला; त्यासाठीं आवश्यक असणारा फ्रेंच जनतेचा विश्वास व पाठिंबा त्याच्या पाठीशीं नव्हता.





अनुक्रमणिका

आपल्याला जनता विसरली, आपल्याविषयीं जनतेंत गैरसमज झाला आहे असें लष्कराला वाटलें; आणि शेवटीं ज्यावेळीं इण्डोचीन त्याला सोडावा लागला त्यावेळीं आपला विश्वासघात करण्यांत आला आहे अशी लष्कराची समजूत झाली.

## विफलतेची भावना

जीं माणसें मरण आनंदानें कवटाळतात त्यांच्यामध्यें ज्या प्रकारची प्रवृत्ति निर्माण होते ती फ्रेंच लष्करांत प्रादुर्भूत झाली, आपणच जिवंत इतिहास जगलों अशी भावना निर्माण झाली. एकीकडे पश्चिम युरोपांतील राष्ट्रें शांततेचें सुख व आनंद उपभोगत असतांना दुसरीकडे आघाडीवर कांहीं मूठभर माणसें साम्यवादी आक्रमणाला तोंड देत होतीं. रोम शहर सुखांत दंग असतांना रोमन सैन्य बाहेर लढत होतें; रोमन सैन्याची त्यावेळीं रोमन साम्राज्यांत परिवर्तन झालें पाहिजे अशी खात्री झाली; तसाच कांहींसा प्रकार फ्रेंच लष्कराच्या बाबतींत झाला.

सतत युद्धाच्या कल्पनेचा लष्करावर पगडा बसल्यामुळें लष्कराची राज्यसत्तेपासून फारकत झाली. इण्डोचीनमधील अधिकाऱ्यांची दुसऱ्या महायुद्धाचें तिसऱ्या महायुद्धांत रूपान्तर झाल्याची भावना झाली; पाश्चिमात्य राष्ट्रांची समजूत पटेना पण प्रत्यक्ष त्यांना तसा अनुभव आला. अणुयुद्धाची कल्पना करतां येत नसल्यामुळें कांहीं अधिकाऱ्यांनीं मर्यादित युद्धाचा पुरस्कार केला.

## साम्यवादाविरुद्ध युद्ध, अल्जीरियांत सुद्धां

१९५४ मध्यें अल्जीरियांत बंड पेटलें, त्याचा अर्थ या तत्त्वज्ञानाच्या अनुषंगानें लावण्यांत आला. या तत्त्वज्ञानाच्या आधारावर विसंबून राहून बंडाचीं खास कारणें शोधण्याची टाळाटाळ झाली व फ्रेंच या बंडाला जबाबदार आहेत याचाहि विसर पडला. साम्यवादाला थोपवून धरण्यासाठीं पाश्चिमात्य राष्ट्रांची एकजूट झाली पाहिजे अशी मागणी पुढें सरसावली. आशियानंतर आफ्रिका, आफ्रिकेनंतर दक्षिण अमेरिका असा साम्यवादाचा प्रसार होणार! युरोपवर साम्यवादाचा हल्ला समोरून न होतां बाजूनें होणार हें लेनिननें भाकित केलें नाहीं काय?

सैन्याच्या या हालचालींमागें धोरण होतें. सर्वसाधारणतः सरकार शत्रूविरुद्ध युद्ध पुकारतें आणि युद्धाचीं उद्दिष्टे ठरवितें. आपला लढा विशिष्ट शत्रूविरुद्ध नसून पाश्चिमात्य राष्ट्रांच्या तर्फे आन्तरराष्ट्रीय साम्यवादाविरुद्ध आहे याची लष्करानें मनाशी खूणगाठ बांधली. लष्कराच्या बंडामागें हा निश्चय होता. जागतिक युद्धामधील अल्जीरियाचें बंड हा एक प्रसंग होता, यांतून माघार घेणें वा शस्त्रसंधि करणें शत्रूच्या पथ्यावर पडणार—आणि या शत्रूवर मात करणें ही तर लष्कराची कामगिरी होय!

अशा रीतीनें लष्कर ही एक स्वयंशासित सत्ता म्हणून पुढें आली. एखाद्या राजकीय पक्षाला वा सत्ताधीशाला पाठिंबा देणें एवढाच त्याचा उद्देश नव्हता. राष्ट्राला वाचवणें हें महत्कार्य लष्करानें अंगिकारिलें होतें; पाश्चिमात्य राष्ट्रांचें त्यांना कल्पना नसलेल्या संकटापासून संरक्षण करणें हा या लढ्यामागील हेतु होता. अल्जीरिया सोडून देण्याचा विचार करणें म्हणजे लढाई चालू असतां मोक्याचें ठाणें हातांतून गमावण्याचा भाषा बोलण्यासारखें होतें!

## इण्डोचीनमधील लढाईपासून घेतलेले धडे

साम्यवादी शत्रूच्या संघर्षामधून साम्यवादाशीं निकरानें युद्ध केलें पाहिजे याची फ्रेंच लष्कराला खात्री पटली इतकेंच नव्हे तर तें कसें लढावें याचीहि शिकवण त्याला मिळाली. इण्डोचीनमध्यें सुसंघटित फ्रेंच लष्कराचा प्रच्छन्न रीतीनें जमा झालेल्या बंडखोरांनीं पराभव केला होता. हरलेल्या लढायापासून पराभूत लष्कर अतिशय काळजीपूर्वक व मन लावून धडे शिकतें! राजकीय कृतीचें पाठबळ नसेल तर अत्यन्त आधुनिक लष्करसुद्धां कुचकामी आहे हें इण्डोचीनच्या लढाईनें शिकविलें. माओत्सेतुंगच्या म्हणण्याप्रमाणें क्रांतिकारक सैन्य हा क्रांतीनें उत्स्फूर्त झालेल्या जनतेचा एक अंश होय. याचा अर्थ लष्करी बळाला तत्त्वज्ञानाची जोड हवी, आणि शिवाय पाठीमागें जनतेची शक्ति उभी करावयास हवी!

## तत्त्वज्ञानाचा शोध

पराभवाच्या वा व्हिएटमिन्हच्या पुनर्शिक्षणाच्या छावण्यांमधील अपमानास्पद अनुभवांमुळें पुष्कळ फ्रेंच अधिकाऱ्यांना लेनिन व माओत्से-तुंग यांच्या सिद्धा-










न्तांची सत्यता पटली. याचा परिणाम असा झाला कीं काहीं कॅप्टन व मेजर यांनीं इण्डोचीनमधून परतल्यावर 'मानसशास्त्रीय उपाय' करणारा एक गट मध्यवर्ती कार्यालयांत स्थापन केला. इण्डोचीनमधील साम्यवाद्यांकडून ज्या कृती ते शिकले होते त्या आतां अल्जीरियांतील बंडखोरांविरुद्ध योजावयाच्या होत्या. एका प्रसिद्ध छत्रीधारी कर्नलनें या शब्दांत लष्कराच्या अल्जीरियांतील कामगिरीचें वर्णन केलें : "आपल्याला जनतेची संघटना वरून खालीं अशी करावयाची आहे. तुम्ही मला फासिस्ट म्हणा, पण आम्हांला लोकांना मऊ करून टाकावयाचें आहे, प्रत्येकाच्या हालचालीचें नियंत्रण करावयाचें आहे."

"मी साम्यवादी तत्त्वज्ञान टाकून दिलेला साम्यवादी आहे", कर्नल ट्रिंकिअर म्हणाला. या लष्करी अधिकाऱ्यांना प्रचारासाठीं व लोकांना उद्युक्त करण्यासाठीं राजकीय तत्त्वज्ञानाची जोपासना करणें प्राप्त होतें. फासिस्टाप्रमाणें त्यांना हें तत्त्वज्ञान गवसलें नाहीं किंवा फारतर असें म्हणा कीं कित्येक तत्त्वांचा त्यांना आसरा घ्यावा लागला. १९२० मधील इटली किंवा जर्मनी यासारखी फ्रान्सची परिस्थिति नव्हती त्यामुळें सर्वाधिकारशाहीचा साचा लागूं पडला नाहीं, त्यामुळें मे १९५८ मध्यें लोकशाही शक्तींशीं झगडा दिल्यानंतर शरणागति पत्करावी लागली तेव्हां या लष्करी अधिकाऱ्यांना पर्याय सापडला नाहीं, त्यांना लोकमताची खात्री पटविणाऱ्या व्यक्तीकडे धांव घ्यावी लागली.

## हुकूमशाहीकडे वाटचाल

कार्यक्षमतेच्या नांवाखालीं लष्करानें हळुहळूं साम्यवाद्यांचे मार्ग चोखाळले. परिणामीं मानवी प्रतिष्ठेला कमी आणणारें वर्तन घडूं लागलें आणि ज्या ध्येयासाठीं — मूल्यासाठीं लढा चालला होता तीं ध्येयें — मूल्यें क्रमशः पायदळीं चिरडलीं गेलीं. एफ्. एल्. एन्. या अल्जीरियन बंडखोरांच्या संघटनेला साम्यवाद्यांच्या पंक्तीला बसविलें; त्यांच्या पुढाऱ्यांनीं साहजिकच मॉस्को व पेकिंगकडे धाव घेतली. अशा रीतीनें साधनें व व्यूहरचना याबाबतींत फ्रेंच लष्कराच्या कार्योत्साही गटानें साम्यवादी शत्रूंशीं विरोधविकासात्मक सहकार दिला ! हुकुमशाहीवर हुकूमशाहीचा गुण लागूं न देतां कशी मात करावयाची हा प्रश्न अवघड आहे खरा !

द गॉलच्या 'स्वायत्तते'च्या घोषणेनें लष्कराचें समाधान झालें नाहीं, एकरूप इच्छाशक्तीचा त्याला अनुभव आल नाहीं. तत्त्वाच्या या द्वंद्वामध्यें लष्कराला एकमेव निश्चित व स्पष्ट कल्पनेची आवश्यकता भासली. म्हणून लष्करानें राजकीय कृतीचा प्रयोग केला. यादवी युद्धाचा शेवट करण्यासाठीं देशभक्ति व शिस्त हीं जुनींपुराणी तत्त्वें पुरेशीं नव्हतीं; सरकारनें आपलें धोरण ठरविलें पाहिजे व त्या धोरणाला चिकटून राहिलें पाहिजे अशी सैन्याच्या अधिकाऱ्यांनीं मागणी केली. सरकार दुबळें व त्यांत फळ्या पडलेल्या, अशा अवस्थेंत लष्करानें सरकारची जागा घेतली. दहा वर्षांच्या सतत लढाईच्या अनुभवानें शाश्वत हितसंबंध व गनिमी युद्धाचीं उद्दिष्टें यांची सुसूत्र कल्पना लष्कराला आली होती.

## सत्तान्तराची पूर्वतयारी

या सत्तान्तराची पूर्वतयारी सरकारनेंच करून दिली होती. अल्जीरियांतील बंडाचा वणवा जसा पसरूं लागला तसे सरकारनें आपले शासनिक व सुरक्षाविषयक अधिकार वाढवले. अल्जीरियाचा सोशॅलिस्ट रेसिडेंट जनरल लॅकॉस्ट यानें जानेवारी १९५७ मध्यें सर्व सत्ता जनरल मासू याच्याकडे सुपूर्द केली हा निर्णायक बदल घडून आला. हें महत्त्वाचें सत्तान्तर विभागाधिकाऱ्याच्या साध्या हुकुमानें झालें. नागरी सत्तेनें सुव्यवस्था राखण्याची कठीण जबाबदारी लष्करावर गुपचूप टाकली. "अल्जीयर्सच्या लढाई"ला सुरुवात झाली. जनरल मासू छत्रीधारी सैनिकांवर विसंबून होता. जनरल मासूनें दहशतवादाला पायबंद घातला. पण त्यासाठीं त्याला हजारो नागरिकांची तुरुंगांत रवानगी करावी लागली, त्यांचा छळ करावा लागला व कित्येकांची हत्या करावी लागली, लष्कराचा विजय झाला पण मानवी हक्कांची पायमल्ली करून. छद्मी सरकारनें याबद्दल कसलीहि जबाबदारी घेण्याचें नाकारलें.

१९५८ च्या आरंभीं निम्म्याहून अधिक फ्रेंच लष्कर (सुमारें ६ लाख) होतें. लढवय्या शिपायांच्या लहान तुकडीशिवाय सुरक्षादल (छत्रीधारी व लष्करी सुरक्षादल), प्रचारविभाग (मानसोपचार विभाग,



अनुक्रमणिका






वर्तमानपत्र व रेडिओविभाग ) आणि संघटित राजकीय-प्रशासकीय यंत्रणा यांचा समावेश लष्करांत होता; त्यांनीं शहरी व ग्रामीण भागावर आपला कब्जा बसविला लष्करानें रस्ते बांधले, निर्वासितांचें पुनर्वसन केलें, अन्नाचें वाटप केलें; त्यांच्यापैकीं कांहींजण पौर, शेतकीसल्लागार, शिक्षक व राजकीय प्रचारक बनले. एफ्. एल्. एन्. शीं चाललेल्या वाटाघाटी यशस्वी झाल्या तर आपले हितसंबंध सुरक्षित रहाणार नाहीत या भीतीनें १३ मे ला युरोपियनानीं उठाव केला; लष्करानें तें बंड शमविलें व 'एकत्रीकरण' आणि 'फ्रेंच-मुस्लीममैत्री' हीं उद्दिष्टें त्यांच्यासमोर ठेवलीं. या प्रसंगीं लष्कराला जें स्थान प्राप्त झालें त्याची घनदाट छाया फ्रेंच धोरणावर यापुढच्या काळांत पडली. काटेकोर भाषा वापरायची झाली तर असें म्हणावें लागेल कीं, लष्करानें बंड पुकारलें नव्हतें, दोन पक्षांच्या मध्यस्थी तें झालें. यादवी युद्ध भडकूं न देतां त्याला पायबंद घातला; युरोपियन व मुस्लिम, अल्जीरिया व फ्रान्स यांना एकत्र आणलें—असा दावा लष्करानें केला. ... लष्करानें सरकारविरुद्ध पवित्रा टाकला नव्हता तर आपण जणुं सरकारच आहोंत असा आभास त्यानें निर्माण केला होता, किमानपक्षीं आणीबाणीच्या प्रसंगीं सरकारची जागा तात्पुरती आपण घेतली असा आव लष्करानें आणला होता.

## लष्करी सरकार प्रस्थापित झालें नाहीं.

नागरी सत्तेनें राजीनामा दिल्यामुळें व मतभेदामुळें ती हतप्रभ झाली होती म्हणून लष्कराच्या या आश्चर्यकारक 'अहिंसक' हालचाली यशस्वी झाल्या. आपल्याला फ्रान्समधील जनमताचा पाठिंबा आहे या विश्वासानेंच लष्करानें या हालचाली केल्या. त्यानें लष्करी सरकार स्थापन करण्याचा प्रयत्न केला नाहीं, जनरल द गॉलच्या पाठीमागें तें उभें राहिलें. लष्करानें संपूर्ण सत्ता हातांत घेतली असें म्हणतां येणार नाहीं. लष्करानें तीन आठवडे सरकारची जागा घेतली होती, कौशल्यानें सरकारला शरणागति पत्करावयास लाविलें. शासनावर कब्जा मिळविण्याची जरी लष्कराची इच्छा नव्हती तरी त्याच्या हातांत नवीन अधिकार खास आले होते.

## लष्कराला अध्यक्षांचा शह

पाचव्या प्रजासत्ताकाच्या अध्यक्षांनीं आपल्या राजवटीचा सनदशीरपणा पटवून देण्याच्या दृष्टीनें लष्कराचे राजकीय अधिकार क्रमशः काढून घेण्यास नेटानें सुरुवात केली. लष्करी अधिकाऱ्यांना शासनीय व राजकीय संस्थांमधून निवृत्त होण्यास भाग पाडलें; राजकारणी उच्चाधिकाऱ्यांची अल्जीरियांतून उचलबांगडी केली, 'मानसशास्त्रीयवृत्ती'ची तुकडी अधिकृतरीत्या बंद केली. 'एकत्रीकरणा' चें ध्येयवाक्य टाकून दिलें आणि त्याऐवजीं 'स्वायत्तते' साठीं आवश्यक असणारी परिस्थिति निर्माण करावयास प्रारंभ केला.

लष्करानें राज्यसंस्थेला दुय्यम अशी भूमिका घेतली आहे असें आतां दोन वर्षांनंतर म्हणतां येईल काय ? लष्कर राज्यसंस्थेच्या ताब्यांत आहे असें म्हणतां येईल काय ? वरवर पाहिलें असतां लष्कर राज्यसंस्थेला शरण गेलें आहे, किंवा बंडांतून उद्भवलेल्या सत्तेशीं त्यानें हातमिळवणी केली आहे असें दिसतें. पण बऱ्याचशा घटनांवरून लष्कराची राजकीय भूमिका संपलेली नाहीं हें स्पष्ट होतें.

## द गॉलच्या दोन पाठीराख्यांचे उठाव

राष्ट्रप्रमुखाचे हुकूम मान्य करतांना अल्जीरियांतील लष्कराच्या प्रमुख नेत्यांना वाईट वाटल्यावाचून राहिलें नाहीं. जानेवारी १९६० मध्यें जनरल मासूनें स्वायत्ततेच्या धोरणाविरुद्ध असल्याचें उघड जाहीर केलें. अल्जीयर्समधून मासू जातांच मे १९५८ मधल्यापेक्षां कमी प्रमाणावर असंतोषाचा उद्रेक झाला. मे १९५८ मध्यें अल्जीरियांत लष्करी प्रमुख असलेला व नंतर नागरिक अधिकारी म्हणून आलेला जन. सलान जन. द गॉलच्या धोरणाविरुद्ध उठला. द गॉलच्या खंबीर पाठीराखे असलेल्या या दोन अधिकाऱ्यांचे उठाव हीं गंभीर परिस्थितीचीं लक्षणें होतीं.

पण यापेक्षांहि उद्वेगजनक अशा कांहीं गोष्टी आहेत. लष्करानें तात्पुरता आपला वरचष्मा सोडला असेल पण राज्यसंस्थेला विचारांत घेण्याइतपत प्रबळ दबाव-गट लष्कराच्या रूपानें पुढें आलेला आहे हें निश्चित. अल्जीयर्स विद्यापीठांतील प्राध्यापक मॉरिस ऑडिन याचा छत्रीधारी सैनिकांनी छळ केला, त्यांत

त्याचा मृत्यु झाला. याला जबाबदार असणाऱ्या व्यक्तींना द गॉलचा तसा हुकूम असूनहि न्यायालयाची पायरी दाखविण्यांत आली नाहीं. 'मानसशास्त्रीय कृती'ची यंत्रणा परत निराळया नांवाखालीं उभी करण्यांत आली आहे. बेजबाबदार लोकांच्या टोळया सुव्यवस्था राखण्याच्या नांवाखालीं क्रूर कृत्यें करीत आहेत. अधिकाऱ्यांच्या या दुष्कृत्याविषयीं द गॉलकडे तक्रारी नेल्या असतां तो उत्तर देतो : "ते माझे हुकूम मानतात अशी आपली कल्पना आहे काय ?"

## द गॉलचें धरसोडीचें धोरण

जानेवारी १९६० मध्यें छत्रीधारी सैनिकांनीं उठाव केला, पण सर्व लष्करानें त्याला साथ दिली नाहीं. सरकारचा जय झाला. द गॉलला लोकमताचा पाठिंबा असूनहि त्यानें लष्कराची मनमिळवणी करण्यासाठीं अल्जीरियांत लष्करी अधिकाऱ्यांच्या त्यांच्या निवासस्थानामधून गाठी घेतल्या. मेलून येथें एफ्. एल्. एन्. शीं चाललेल्या वाटाघाटींत लष्करानें मोडता घातला. या वाटाघाटी धोरणाविषयीं नसून युद्धबंदीच्या अटीविषयीं आहेत असा द गॉलनें लष्कराला दिलासा दिला.

अद्यापहि लष्कर गूढ राजकीय प्रभाव गाजवत आहे, लवाद वा हुकमी एक्क्याची भूमिका अद्याप लष्कराकडे आहे या निष्कर्षाप्रत आपण येतों. लष्कर सरकारचे हुकूम मानतें, पण कांहीं अटीवर. सरकारनें राष्ट्रीय हितसंबंधाशीं सुसंगत असें वर्तन केलें पाहिजे. राष्ट्रीय हितसंबंधांची किल्ली व अर्थ लष्करापाशीं आहे. नागरी सत्तेहून श्रेष्ठ व त्या सत्तेचें अधिकारक्षेत्र मर्यादित करणारी कायदा व सुव्यवस्था राखणारी यंत्रणा आपल्या हातांत आहे असा विश्वास अजूनहि प्रमुख लष्करी नेत्यांना वाटतो. शिवाय, आपली निष्ठा आपण ज्याच्यावर उपकार केले आहेत अशा व्यक्तीशीं आहे, राज्यसंस्थेशीं नाहीं असं लष्कराला वाटतें.

## लष्कराची राजकीय भूमिका

लष्कराची राजकीय भूमिका क्रांतिकारकहि नाहीं वा कृतिप्रधानहि नाहीं. लष्करांतील कांहींजण क्रांतिकारक प्रवृत्तीचे आहेत. मुसलमानांची करुणाजनक परिस्थिति पाहून कांहीं अधिकारी राष्ट्रप्रेमामुळें उदार वसाहतशाहीविरोधी अशा समाजवादाकडे वळले आहेत. कांहींजण कॅथॉलिक प्रतिगामित्वाच्या पक्षाचे असून फ्रान्सची पुनर्घटना हुकूमशाही व संघप्रधानता या तत्त्वावर करावी असें स्वप्न त्यांनीं उराशीं बाळगलें आहे. कित्येक गुप्त मंडळयांनीं लष्करांतील निरनिराळया गटांशीं सत्ता काबीज करण्याच्या दृष्टीनें संधान बांधलें आहे. शिबंदी-अधिकाऱ्यांचे कांहीं संघ वस्तुतः राजकीय स्वरूपाचे असून फ्रेंच अल्जीरियाच्या संरक्षणासाठीं ते टिकून आहेत. सर्वांत भयप्रद घटना म्हणजे लष्कर व जहाल युरोपियन यांची गट्टी ही होय. सरकारनें ही गट्टी फोडण्याच्या दृष्टीनें उपाय योजिले आहेत. जहाल पुढाऱ्यांच्या अतिरेकी कृतीमुळें लष्कर त्यांच्यापासून दूर जाऊं लागलें आहे.

लष्कराची राजकीय भूमिका नकारात्मक आहे; फ्रान्स व पाश्चिमात्य राष्ट्रें यांचें श्रेष्ठ हित संरक्षिण्याच्या मिषानें तयार झालेला तो दबावगट आहे. सरकारला काय करावें यापेक्षां काय करूं नये हें लष्कर आतां सांगतें. विशिष्ट मर्यादेपलीकडे गेलें असतां आपण सरकारचे हुकूम पाळावयास बांधिल नाहीं असें लष्कर बजावीत आहे. अल्जीरियावरील फ्रेंच सार्वभौमत्वाचा त्याग करूं नये व जनता-आघाडीचें सरकार बनवूं नये या त्या मर्यादा होत.

## द गॉलची निष्क्रियता

जनरल द गॉलला लष्कराच्या या राजकीय भूमिकेची जाणीव आहे. लष्कराचें अल्जीरियांत गुंतलेलें लक्ष विचलित करण्याचा द गॉलचा प्रयत्न चालूं आहे. अण्वस्त्रांनीं लष्कर सुसज्ज केलें असतां राजकारणी अधिकाऱ्यांची हातची निर्णायक सत्ता तंत्रज्ञांच्या हातांत जाईल असा द गॉलचा कयास आहे. अल्जीरियांतील युद्ध जोपर्यंत चालूं आहे तोपर्यंत हा बदल कसा घडवून आणावयाचा ? युद्धबंदीच्या वाटाघाटी लष्कराच्या हस्तक्षेपामुळें यशस्वी होत नाहींत. द गॉलनें या शृंगापत्तीवर समोरून हल्ला चढविलेला नाहीं. लष्करांत बंड किंवा दुफळी होऊं न देतां शांतता प्रस्थापित करण्याचा द गॉलचा मानस आहे. १९४० मध्यें लष्करानें सरकारच्या हुकुमाचा केलेला अवमान व तेव्हां लष्करांत झालेली दुफळी द गॉलच्या मनापुढें येतें व त्याला काय करावें हें सुचत नाहीं. द गॉलच्या








या निष्क्रियतेविरुद्ध डावे गट व विद्यार्थि-प्राध्यापक यानीं निदर्शनें सुरू केलीं आहेत.

लष्करांतील सैनिक व बिनसनदी अधिकारी सरकारच्या मागें आहेत. लष्करांतील एकतृतीयांश अधिकारी मालीसंघराज्य, कांगो येथील घटनांमुळें सरकारला विरोधी आहेत. लष्करी क्रांति झाल्यास सार्वत्रिक संप करूं अशी मजूरसंघटनानीं घोषणा केली आहे. फ्रान्सची आधुनिकीकरणाच्या दिशेनें आगेकूच चालली असून देशाचा लष्करी हुकूमशाहीला विरोध आहे. देशांतील बहुसंख्य जनता आपल्या विरुद्ध आहे अशीं लष्कराची खात्री पटल्यास लष्कर हालचाल करणार नाहीं.

### लष्करी क्रांति घडवून आणील असा नेता नाहीं

लष्कराचें नेतृत्व करणारा अधिकारीहि सध्यां दिसत नाहीं. लेक्लेर्क व टॅसिग्नी हे दोन विख्यात मार्शल कालवश झाले आहेत. ज्युइं हा तिसरा विख्यात मार्शल अल्जीरियन असून त्याचा द गॉलच्या 'स्वायत्तते'च्या धोरणाला विरोध आहे, परंतु त्याचा राजकीय दृष्टिकोन कोता आहे व त्याच्यापाशीं लष्करी क्रांतीसाठीं लागणारे गुण वा दोष नाहींत.

### लष्कराची काय भूमिका राहील ?

अल्जीरियामध्यें फ्रेंच सरकारचा लष्करी विजय होऊन सुद्धां राजकीय पराभव होण्याची शक्यता आहे. लष्कर एफ्. एल्. एन्. पुढें शरणागति पत्करणार नाहीं. एफ्. एल्. एन् चा वाटाघाटींत विजय झाल्यास आपल्या बाजूला असलेले मुस्लिम सैनिक व नागरिक यांच्यावर बंडखोर बदला घेतील हीहि भीति लष्कराला वाटते. अल्जीरियांतील युद्धाचा शेवट होण्यापूर्वी द गॉलची राजवट कोलमडल्यास त्याचा वारसदार लष्कराच्या संमतीवाचून अधिकारावर येईल हें संभवत नाहीं. अशा रीतीनें लष्कराचा अप्रत्यक्ष प्रभाव प्रत्यक्ष दिसेल.

युनोनें हस्तक्षेप केल्यास किंवा फ्रान्सचा अपमान होईल अशी राजकीय योजना पुढें आल्यास लष्करांतील उत्साही अधिकारी जहाल युरोपियनांशीं संगनमत करून उठाव करतील व मग फ्रान्स व जागतिक शान्तता यांना धोक्यांत आणणारी परिस्थिति निर्माण होईल. फ्रेंच जनतेनें स्थिर शासन अधिकारावर आणलें तरच लष्कर नागरी सत्तेला दुय्यम असें स्थान स्वीकारील.

---





अनुक्रमणिका








डॉ. इन्दुमती पारीख

# आयुर्वेद व आधुनिक वैद्यक- एक टीप

आयुर्वेद म्हणजे हजारो वर्षे चालत आलेली भारताची वैद्यक पद्धति होय. शरीर सुदृढ राखण्याची कला माणसानें अनादिकालापासून अवगत करून घेण्यास सुरवात केली. अगदीं रानटी जमातींत सुद्धां थोडीफार औषधयोजनेची तरतूद दृष्टीस पडते. अनेक वर्षांच्या अनुभवानें सिद्ध झालेल्या औषध योजना व उपचार एकत्रित करून आयुर्वेद पद्धति प्राचीनकाळीं भारतांत अस्तित्वांत आली. चरक, सुश्रुत किंवा वागभट्ट यांचे सारख्या ख्यातनाम वैद्यश्रेष्ठांबरोबरच कितीतरी अनामिक वैद्यांनीं या पद्धतीच्या वाढीस हातभार लावला असेल. कुठचेंहि ज्ञान पिढ्यानपिढ्यांचे अनुभवानें व प्रयोगानें वाढत जातें. नव्या कल्पना, नव्या पद्धति व नवें ज्ञान आत्मसात् करून त्यांचे जोरावर शास्त्र वाढवणें ही क्रिया मानवाचे आयुष्यांत अव्याहत चालूं आहे. चरक, सुश्रुत इत्यादींचे ग्रन्थांकडे पाहून आयुर्वेद ही एक पूर्णत्वास पोचलेली बंदिस्त पद्धति नसून सतत विकास पावणारी प्रगल्भ पद्धति होती हें स्पष्ट होतें.

आयुर्वेदांत मनुष्याच्या आयुरारोग्याचा व्यापक व सर्वांगीण विचार केलेला दृष्टीस पडतो. रोगी माणसावर करण्याचे औषधोपचार तर त्यांत सांगितले आहेतच; परंतु निरोगी माणसानें आपलें आरोग्य कसें टिकवावें यावरहि त्यांत विवेचन केलेलें आहे. आरोग्य टिकविण्यासाठीं कसें वागावें, काय खावें, व्यायाम काय घ्यावा, मानसिक आरोग्य कसें राखावें या सर्वांसंबंधी आतांच्या काळांत सुद्धा आचरणांत आणावेत असे कांहीं नियम आयुर्वेदांत सांगितलेले आहेत. माणसाचा आजार हा फक्त शरीराचा किंवा शरीराच्या एखाद्या भागाचा आजार नसून संबंध माणसाचा आजार आहे. एक भाग बिघडल्यास त्याचे परिणाम सर्व शरीरावर काय होतात याची चर्चा या पद्धतींत आढळते. रोगचिकित्सा करतांना लक्षांत घेण्याच्या काहीं महत्त्वाच्या गोष्टी आधुनिक वैद्यकानें आयुर्वेदापासून शिकण्यासारख्या आहेत. माणसाच्या प्रत्यक्ष तपासणीबरोबरच त्याच्या सभोवतालची परिस्थिति, त्याचा स्वभाव, त्याचें खाणें पिणें व इतर सवयी यांचा एकसमयावच्छेदेंकरून विचार करण्याची आवश्यकता त्यांत आहे. आजाराच्या इतिहासाचा म्हणजे तो कसा व कोणत्या परिस्थितीत सुरू झाला किंवा कसा वाढला याचा विचार करूनच औषध योजना केलेली दृष्टीस पडते. प्रत्येक माणसाचें शारीरिक भिन्नत्व लक्षांत घेतलें जातें. त्याबरोबरच औषधयोजनापण अनेक प्रकारची आढळते. काढे, कषायें, चाटणें किंवा भुकट्या किंवा गोळ्याप्रमाणेंच निरनिराळ्या बाहेरून लावण्याच्या तेलें, मलमें, किंवा लेप यांचा वापर त्यांत आढळतो. थंड, गरम व औषधिमिश्र पाण्यांच्या निरनिराळ्या स्नान पद्धति त्यांत आहेत. तसेंच अनेक धातूंचे औषधि गुण लक्षांत घेऊन त्यापासून औषधें बनविलेलीं आहेत. औषधें तयार करण्याच्या निरनिराळ्या पद्धति आयुर्वेदांत असून सूर्यचंद्राचे किरणांचा उपयोग तीं तयार करतांना केलेला दृष्टीस पडतो. मोडलेलीं हाडें बसवण्यास फळ्यांचा किंवा बांबूंचा उपयोग केलेला दिसतो तर शस्त्रक्रियेंत कापलेलीं नाकें किंवा कान दुरुस्त करतांना ज्याला आपण प्लॅस्टिक शस्त्रक्रिया म्हणतो तिचा वापर केलेला दिसतो. अशा रीतीनें कालाच्या मानानें अत्यंत प्रगल्भ असलेली ही वैद्यक पद्धति गेल्या पांच पन्नास वर्षांत वादग्रस्त कां झाली हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

इंग्रजांचा आपला विशेष संपर्क दीडशें वर्षांतला आला व त्यांचे बरोबर साहजिकच पाश्चात्य संस्कृतीशीं व ज्ञानाशीं आपला संबंध आला व वाढूं लागला. याच काळांत पाश्चात्यांनीं अनेक शास्त्रांतून अतोनात प्रगति केली. त्याचा परिणाम त्यांचे वैद्यकावर होऊन तेहि वाढीस लागलें. शवविच्छेदन निषिधाह न मानतां माणसाची शरीररचना अभ्यासण्याचें एकमेव साधन बनलें. फिजिऑलॉजीमध्यें हार्वेच्या रक्ताभिसरणाच्या शोधापासून वाढ होण्यास सुरवात होऊन शरिरांतील

निरनिराळ्या इन्द्रियांचे कामाबद्दल व शरीरांत तयार होणाऱ्या रसाबद्दल संशोधन सुरू झालें. रसायनशास्त्राच्या मदतीनें अनेक रसांचें विश्लेषण करून अन्न पचनासारख्या क्रिया समजूं लागल्या. मायक्रॉस्कोपच्या साहाय्यानें निरनिराळे अवयव कसे व कसले बनले आहेत, त्यांत बिघाड झाला म्हणजे काय होतें याचें ज्ञान मिळणें सहज शक्य झालें. निरनिराळे रोग जंतूमुळें होतात हें सिद्ध झाल्यामुळें बऱ्याचशा आजारामागील गूढत्व नाहींसें झालें आहे. आजारी पडणें म्हणजे काय होणें याची माहिती मिळूं लागल्यामुळें रसायन व इतर शास्त्रांच्या साहाय्यानें रोगांचा प्रतिकार करणें सोपें होऊं लागलें. त्याबरोबरच कोणते जंतू कोणत्या वातावरणांत जास्त फैलावतात याचेंहि ज्ञान वाढून प्रतिबंधक वैद्यक शक्य होऊं लागलें. पाश्चात्य वैद्यकानें गेल्या पंचवीस वर्षांत केलेली प्रगतितर सर्वांचे डोळ्यासमोर आहे सल्फानमाईडपासून ॲण्टिबॉयाटिकपर्यंतचीं औषधें, व्हायरससारख्या अतिसूक्ष्म जंतूंचा शोध व त्यावरील उपाय, माणसाचे निकामी झालेले भाग काढून त्याचेऐवजीं दुसरे बसवण्याची शस्त्रक्रिया, हृदय किंवा मूत्रपिंड यांचीं कामें करणाऱ्या यंत्रांचा शोध हीं सर्व आश्चर्यकारक प्रगतीचीं द्योतकें नाहींत असें कोण म्हणेल ! चामडी किंवा हाडें यांचे ग्राफ्ट्स् आतां जुने झाले असले तरी रक्तवाहिन्या विशेषतः धमन्या ( Arterial grafts ) किंवा डोळ्याचा कॉर्निआ एकाचा दुसऱ्यास किंवा नुकत्याच मेलेल्या माणसाचा दुसऱ्यास बसविण्याची कला आत्मसात करणाऱ्या आधुनिक वैद्यकीय माणसांबद्दल कुणासहि अभिमानच वाटेल. अनेकांचे जीव वाचवणारी रक्तदानाची पद्धति शोधून काढल्याबद्दल त्यास धन्यवादच दिले जातील. अशा प्रकारची वैद्यक पद्धति अस्तित्वात असतांना ती पद्धति परक्यांची आहे म्हणून वापरूं नये हें म्हणणें कोणाहि सामान्य वा सूज्ञ माणसास कसें पटेल. जगांत अस्तित्वांत येणारें ज्ञान हा सर्वांचा वारसा होय. भारतीय ज्ञान व पाश्चात्य ज्ञान हीं वेगळीं असूं शकत नाहींत. जगाच्या कोठच्याहि कोपऱ्यांत लागणाऱ्या शोधाचा वारसा सर्व मानवजातीचा आहे हें जगाचा इतिहास स्पष्ट दाखवीत आहे. तें ज्ञान आत्मसात करण्यांत, किंवा त्याचा उपयोग करण्यांत निरनिराळया मानव जाती आपआपल्या कुवतीप्रमाणें मागें पुढें रहातील परंतु त्यांत आपपरभाव रहाणें शक्य नाहीं. आधुनिक वैद्यक वापरणारांचा हाच दृष्टिकोण आहे कुठचीहि पद्धति किंवा औषध आयुर्वेदांत, युनानींत किंवा अगदी रानटी जमातींत आहे म्हणून तें त्याज्य असा दृष्टिकोण ज्यादिवशी आधुनिक वैद्यक स्वीकारील त्या दिवशीं त्याच्या ऱ्हासास सुरुवात होईल हें निश्चित.

इंग्रज इथे आल्याबरोबर किंवा त्यांची राजवट इथे सुरू झाल्याबरोबर त्यांच्या व आमच्या वैद्यकांत विरोध न येण्याचें मुख्य कारण पाश्चात्य वैद्यकसुद्धा त्याकाळीं आमचे फारसें पुढें नव्हतें. त्यांचेकडील ज्ञान इकडे प्रसृत होण्यासहि थोडाफार वेळ लागलाच. परंतु आम्ही नुसते होतो तिथेच न रहातां मागें जाऊं लागलो व पाश्चात्य पद्धति भरधाव पुढें निघाली. दोहोंतील अंतर वाढूं लागलें एक नव्या जोमानें नवीन मिळणाऱ्या ज्ञानाच्या साहाय्यानें वाढणारें तर दुसरें एकेकाळीं खूप वाढलेलें पण पूर्णपणें संचित म्हणून संकुचित होत चाललेलें. यांतील झगडयांत कालान्तरानें सरशी कुणाची होणार हें ठरलेलेंच होतें.

स्वातंत्र्य मिळाल्यावर सर्वच भारतीय कलांचें पुनरुज्जीवन होण्यास सुरवात झाली. परंतु बदलत्या काळाचीं पावलें ओळखून जुनें जसेंच्या तसें नव्या वातावरणांत आणण्याचा प्रयत्न न करतां जुन्यांतील चांगलें टिकावू तेवढें पारखून घेऊन पुढें जाणेंच योग्य हें ओळखावयास पाहिजे. काव्य, नाट्य किंवा नृत्य या सारख्या कलांनासुद्धां नव्या परिस्थितींत जगण्याकरितां व वाढण्याकरितां नव्या तंत्रांचा व नव्या कल्पनांचा उपयोग करावा लागतो. दळणवळणाच्या साधनांत झालेल्या क्रान्तीचा आपल्या जीवनावर केवढा परिणाम झाला आहे हें विचारांत घेणें जरूर आहे. जीवनाच्या इतरहि क्षेत्रांत आमूलाग्र बदल होत असतां शरीर सुदृढ राखण्यासाठीं व रोगांचा प्रतिकार करण्यासाठीं मात्र हजारों वर्षांपूर्वीचीं साधनें होतीं तशीच वापरण्याचा अट्टाहास धरणें बरोबर आहे कां ? ही पुरातन पद्धति कितीहि भारतीय असली, आपल्या जुन्या संस्कृतीशी कितीहि जुळणारी असली व आपल्या दरिद्री अवस्थेंत वरकरणी कितीहि स्वस्त वाटली तरी हल्लीच्या माणसांच्या सहज प्रवृत्तींशी जुळणारी आहे कां ? आपलें शरीर टिकवणें ही माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति

आहे व तें टिकविण्यासाठी उपलब्ध असलेले सर्व उपाय वापरणें हें पण साहजिकच आहे. अध्यात्माच्या व आत्म्याच्या अमरत्वाच्या कोणी कितीहि गप्पा मारल्या तरी शरीर आहे तर माणूस आहे हें सर्वांसच पटतें. आयुर्वेदाचें प्रगल्भत्व तरी काय सांगतें? शरीर सुदृढ राखण्याकरतांच ना चरक सुश्रुतादींनीं एवढे श्रम करून आयुर्वेद वाढवला? तत्कालीन अडचणींतून बाहेर पडून आजारी पडल्यावर झाडपाले शोधीत फिरण्याची पाळी आपल्यावर येऊं नये म्हणूनच आयुर्वेदासारखी प्रगल्भ वैद्यक पद्धति त्यांनीं अस्तित्वांत आणली ना?

हजार पंधराशे वर्षांत व विशेषतः गेल्या शतकांत भारतांत अनेक बदल झालेले दिसून येतात. लोकसंख्या भरमसाट वाढली व वाढत आहे. दळणवळणाचीं साधनें झपाट्यानें वाढून जग लहान बनलें आहे. शहरांची संख्या वाढून दाटीदाटीनें रहाण्याखेरीज गत्यंतर राहिलें नाहीं. य पार्श्वभूमीवर आयुर्वेदाचा वापर कितपत सोईचा व स्वस्त पडेल हें ताडून पहाणें जरूर आहे. गत इतिहासावर जगण्याची आपली सवय अजूनहि गेली नाहीं. आयुर्वेदहि पूर्वपुण्याईवर जगण्याची पराकाष्ठा करीत आहे. जीवनांतील इतर क्षेत्रास पाश्चात्यांचे संपर्कानें धक्का मिळाला व त्यांस थोडीफार चालना मिळाली; आयुर्वेदास तशी चालनासुद्धां मिळालेली दिसत नाहीं. इंग्रजी राज्यांत राजाश्रय न मिळाल्यामुळें ही परिस्थिति होती या म्हणण्यांत फारसें तथ्य वाटत नाहीं. जुनें तेंच खरें त्यांत बदल करण्याची किंवा तें वाढवण्याची जरूरच नाहीं ही मागासलेली व आडमुठी वृत्तीच त्यांचे मागें आहे असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. मोठमोठ्या शहरांत रोगनिवारणाइतकेंच किंबहुना जास्तच महत्त्व रोग प्रतिबंध उपायांना द्यावें लागतें. लाखो माणसांना बेजार करणाऱ्या मलेरियाचा प्रतिबंध करण्यास डी. डी. टी च वापरावी लागते पेनिसिलिनचा वापर न्युमोनिया बरा करण्याकरतां करावाच लागतो. अशीं कितीतरी आधुनिक औषधें माणसांचा जीव वाचवण्यास समर्थ असतां तीं आयुर्वेदांत नाहींत किंवा महाग पडतात म्हणून बहुसंख्य लोकांनीं वापरूं नयेत असें कसें म्हणतां येईल? महाग असलीं तर तीं स्वस्त कशीं होतील याचा विचार करायला पाहिजे. तीं वापरण्याचें सोडून देणें योग्य होणार नाहीं. आयुर्वेदांत पुष्कळ प्रभावी औषधें असणें शक्य आहे. परंतु आज त्यांची योग्य ती माहिती बहुसंख्य आयुर्वेदीय वैद्यांना नाहीं. त्या औषधांतील 'जिवन्त तत्त्व' कुणासच माहीत नाहीं. थोडक्या औषधांत थोड्या वेळांत अनेक रोगी बरे करण्याचीं साधनें आयुर्वेदांत आढळत नाहींत. तो त्या पद्धतीचा दोष नाहीं. हजार पंधराशें वर्षांपूर्वींच्या पद्धतींत सद्यस्थितीस तोंड देण्याची कुवत नसणें साहजकच आहे.

आयुर्वेद सर्वस्वी टाकावूं आहे असें कुणाचेंहि म्हणणें नाहीं. व असूं शकत नाहीं त्यांत जें जें चांगलें आहे, शाश्वत आहे, तें तें आजच्या माणसानें घेणें त्याचें कर्तव्य ठरतें. त्यासाठीं आयुर्वेदाचा कसून अभ्यास व्हावयास पाहिजे; पण तो अभ्यास करतांना आयुर्वेद इतिहास आहे हें विसरून चालणार नाहीं. तो शास्त्राचा इतिहास असल्यामुळें त्याचेवर संशोधन झालें पाहिजे. शाळा-कॉलेजांतील शिकावूं मुलामुलींच्या अभ्यासाचा तो विषय बनूं शकत नाहीं. तो तज्ञांच्या अभ्यासाचा विषय झाला पाहिजे. आधुनिक शास्त्रांची कसोटी लावून त्यांतील शाश्वत सत्य शोधून काढलें पाहिजे. चरक सुश्रुतांचीं नुसतीं भाषांतरें होऊन उपयोगी नाहीं. तर आयुर्वेदांतील सिद्धांत त्यांतील औषधी रसायनशास्त्र किंवा फॅार्मॅकॉलॅाजी यासारख्या शास्त्रांच्या प्रयोगशाळांतून अभ्यासिल्या गेल्या पाहिजेत. आधुनिक माणसाच्या जीवनांत उपयुक्त ठरलेल्या पद्धति किंवा औषधें आधुनिक वैद्यक सहज आत्मसात करील. आजसुद्धां प्रयोगशाळांतून तावून सुलाखून बाहेर पडलेली आयुर्वेदीय औषधें गोळ्या, इंजेक्शनें किंवा इतर रीतीनें आधुनिक वैद्यक वापरतच आहे. निरनिराळ्या उपचार पद्धति प्रत्यक्ष प्रयोगानें सिद्ध होऊन त्यातील गूढत्व नाहींसें होणें जरूर आहे. कोठलीहि वनस्पति किंवा रसायन पिढ्यान् पिढ्या वापरल्या म्हणून उपयुक्त ही विचार पद्धति जाऊन प्रत्येक औषध शास्त्रीयदृष्टींतून तपासून पहाण्याची जरूर आहे हा विचार रूढ झाला पाहिजे.

सद्यःपरिस्थितींत आयुर्वेद वापरणें शक्यच नाहीं. कुठचीहि रोगाची साथ आयुर्वेद वापरून आटोक्यांत आणतां येणार नाहीं. कोणतीहि नागरी संस्कृति आयुर्वेदानें आपलं आरोग्य टिकवूं शकणार नाहीं. आयुर्वेद








हें ग्रामीण संस्कृतीचें शास्त्र आहे. यन्त्रयुगांत तें वापरणाऱ्या माणसाचा टिकाव लागणार नाहीं. स्टेथस्कोप वापरणारे वैद्य सर्रास पेनिसिलीनचा वापर करतात हें कसलें द्योतक आहे. हीं काळाचीं चिन्हें अवळखून वैद्यक शिक्षण घेणाऱ्या सर्वांना स्टेथस्कोप वापरायला शिकवणेंच योग्य. शुद्ध आयुर्वेद आणि मिश्र आयुर्वेद या सारख्या दिशाभूल करणाऱ्या संस्था आधुनिक जगांत टिकणार नाहींत. बैलगाडी आणि विमान यांत आधुनिक माणूस सर्व धोके पत्करून सुद्धा विमानच सोईचें ठरवील. हा काल शास्त्राचा आहे, यंत्रांचा आहे. आयुर्वेद टिकावयाचा असेल तर आधुनिक प्रयोगशाळेंतून बाहेर पडलेला, आधुनिक वैद्यकानें आत्मसात केलेला आयुर्वेद टिकल.

वाढत्या लोकसंख्येचें आरोग्य सांभाळण्याचा जवळचा रस्ता म्हणून सरकारनें पण आयुर्वेदाच्या सध्याच्या वापरास उत्तेजन देणें फायद्याचें नाहीं. त्यांत जनतेचें आरोग्य तर सांभाळतां येणार नाहींच पण आयुर्वेदसुद्धां टिकणार किंवा वाढणार नाहीं. उलट शक्य तितक्या लवकर आयुर्वेदाची शास्त्रशुद्ध पहाणी करणें जरूर आहे. आयुर्वेदास सरकारी साहाय्य आहे म्हणून आज अनेक व्यापारी आयुर्वेदी रसशाळा आपलीं औषधें बाजारांत आणत आहेत. सध्याच्या जाहिरातबाजीच्या युगांत हीं औषधें वापरलीं जाणें पण शक्य आहे. पण त्यांत धोका आहे हेंहि विसरून चालणार नाहीं आधुनिक वैद्यकानें वापरणाऱ्या औषधांवर अनेक अंतर्गत व सरकारी बंधनें आहेत; तशीं बंधनें आयुर्वेदीय औषधांवर कोण आणूं शकेल ? ज्या पद्धतीचा शास्त्रशुद्ध पद्धतीवर विश्वास नाहीं किंवा ज्यांचा शास्त्र म्हणून विचार होऊं देण्यास सुद्धां त्या पद्धतींतील अध्वर्यु विरुद्ध आहेत त्यांतील औषधास ज्याला मानक (स्टँडर्ड) म्हणतात तं लावणार कसें व कोण ? या करतां आयुर्वेद तपासण्यासाठीं प्रयोगशाळा काढणें जरूर आहे. शाळा कॉलेजांचें तें काम नाहीं. आयुर्वेदाचें स्थान भारताच्या सांस्कृतिक इतिहासांत अमर आहे. त्यांतील उत्तमोत्तम कल्पना व औषधि आधुनिक माणसास उपलब्ध करून देण्याचें काम या पुढें करावयास पाहिजे. या नव्या दृष्टिकोणान आयुर्वेदाकडे पहाण्यांतच आयुर्वेदाची थोरवी वाढेल व आमचें पाऊल पुढें पडेल.

---





अनुक्रमणिका







श्री. सुनंदा कौंडिण्य

# दक्षिण कोंकणी-( सारस्वत आणि गौडसारस्वत ): कांहीं विचार :२:

आपण असें पाहिल कीं सारस्वत ब्राह्मण समाजाची भाषा ही, प्रदेश व ज्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध आला तो समाज व त्यांची भाषा ह्या गोष्टी जरी बदलल्या तरी प्रकृतिशः बदलतांना दिसत नाहीं. ज्या समाजाशीं शतकानुशतकें संबंध आला त्यांच्या भाषेंमधील कांहीं शब्दांखेरीज कोणत्याहि प्रकारचें ऋण तिनें घेतल्याच दिसत नाहीं. परंतु, त्याउलट, गौडसारस्वत ब्राह्मणांच्या भाषेनें मात्र ज्या ज्या संस्कृतीशीं – भाषेशीं तिचा निकटचा संबंध आला त्या त्या संस्कृतीशीं - भाषेशीं, केवळ बाह्य लक्षणांनींच नव्हे तर तिच्या प्राकृतिक स्वरूपानेंहि, कमीअधिक प्रमाणांत संकर होऊं दिला असावा असें त्या त्या भाषांच्या स्वरूपावरून स्पष्टपणें दिसतें. आणि म्हणूनच, गौडसारस्वतांची कोंकणी भाषा हीसुद्धां जरी कोंकणीच असली तरीहि प्रकृतीनें व बाह्य लक्षणांनींहि पोर्तुगीज, मराठी, उत्तरकोंकणी, कानडी वगैरे भाषांच्या लकबी उचलून आत्मसात् करितांना दिसते.

अशाप्रकारें कोंकणीचीं जीं भिन्न स्वरूपें दिसतात, त्यांमधील मग मूळ कोंकणी कोणती मानावी, कां मानावी हा प्रश्न मग आपोआपच निर्माण होतो.

ह्या ठिकाणीं कोंकणीची जी प्रकृति म्हणजेच तिच्यामधील अंतर्गत लय– हेल यांचें विश्लेषण करणें हें आवश्यक ठरतें. आणि ह्यासाठीं ह्याठिकाणीं ज्या वैदिक-संस्कृतचीं वैशिष्ट्यें घेऊन ही कोंकणी जन्माला आली तिचीच, उच्चार संपूर्णपण व अविकृतपणें चिन्हांकित करण्याची जी पद्धति, तिचाच अवलंब केल्यास तें अयोग्य होणार नाहीं. तेव्हां त्याचपद्धतीनें सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी आणि गौडसारस्वत ब्राह्मणांच्या कोंकणीचीं कांहीं ठळक रूपें यांचें विश्लेषण करूं. अर्थातच याठिकाणीं भाषेचें उच्चारांनुसार लेखन करणें अपरिहार्य आहे.

सूचि : ( १ ) अ = उदात्त
अ॒ = अनुदात्त.
अ॑ = स्वरित.

– उच्चारांचे स्थूलमानानें तीन स्वर मानले आहेत. त्यांपैकीं खालचा ( मंद्र ) स्वर म्हणजे अनुदात्त; वरचा ( तार ) स्वर म्हणजे स्वरित; व, मधील ( मध्यम ) स्वर म्हणजे उदात्त होय.

**मात्रा :** ( २ ) एक लघु स्वर वा एक लघु स्वरयुक्त व्यंजन यांचा उच्चार करण्यास लागणारा काळ म्हणजे एक मात्रा. ही फोड करतेवेळीं “अ॒” अशा चिन्हानेंहि दर्शविला जातो. ज्यावेळीं लघु स्वराचा वा लघु स्वरयुक्त व्यंजनाचा उच्चार एकाहून अधिक मात्रांपर्यंत लांबविला जातो त्यावेळीं त्या अधिक मात्रांची संख्या त्या विशिष्ट स्वराच्या वा व्यंजनाच्या समोर लिहिली जाते

( ३ ) गुरु ( दीर्घ ) स्वराचा वा गुरु स्वरयुक्त व्यंजनाचा उच्चारकाल दोन मात्रा. ज्यावेळीं गुरु स्वराचा वा गुरु स्वरयुक्त व्यंजनाचा उच्चार दोन मात्रांहून अधिक काळ लांबविला जातो त्यावेळीं अधिक मात्रांची संख्या त्या विशिष्ट स्वराच्या वा व्यंजनाच्या समोर लिहिली जाते.

( ४ ) केवळ एक अवग्रह ‘ऽ’ म्हणजे एक मात्रा. परंतु अऽआ म्हणजे अ, ‘ऽ’ व आ = प्रत्येकीं $\frac{1}{3}$ मात्रा.

( अ ) वैदिक संस्कृतः–

नि षसाद धृतव्रतो वरुण प स्ता ३ स्वा ।
साम्राज्याय सुक्रतुः ॥

सारस्वत ब्राह्मणांची कोंकणीः- आत्तं सम १ जाळ्ळॅ म्हणूं १ लॅक्रूतां. जाळ्ळ तरी १ ( १ मात्रा = ‘केई’ = सुद्धां ) आनी एक फंतां पळौंका. न्हंइ जाल्यारी ऐन् वॅळारी रात्तीं समारंभान्तूं चुकूल्यारी सगूळॅ जानं १ हास्तलॅं गॉ.








ह्या ठिकाणीं स्पष्ट उच्चार, द्वित्व, आवाजामधील (pitch विशिष्ट चढउतार, स्वरांची लांबण, stress आणि त्यामुळें तयार होणारे विशिष्ट हेल ह्या बाबतींत एक प्रकारचें साम्य दिसतें.

(ब) पोर्तुगीज :– ग्रांथिक रूप :– "O' Senhor? Como Esta'? Esta Bom? Queria Saber uma Coiza de Sr."="ऑ सिनोर? कोमु इश्ता? इश्ता बाँ? केरीय साबेर, उम कोयझ द सी."

उच्चारानुसारीः– "ऑऽऽऽ सी न्यो र? कॉमुइ श्ता? इश्ता बाँ १ ? के री ऽ यु साबेर् उ ऽम को इअ ज्झ द् स्सी."

### गोमांतकीय गौडसारस्वत ब्राह्मणांची कोंकणी

ग्रांथिक रूप :– "अरे किते ('अे' चा उच्चार अे १ अॅ असा पसरट होतो) करता? कसॉ आसा? बरॉ आसा म रॅ। रे तूं? या दिसांक तुगेली खबर कळलीच ना माका."

उच्चारानुसारी – "अरे कित् कर्ता? कसॉ आसा? ब ऽ र् आसा म रॅ। रे तूं १ ? या दिसाङ् तुगे लि खबर् कळ् लीच् ना माका."

द्वित्व व stress कमी करणें, पुसटते उचार (अे। अॅ > अे १ अ; दिसांक > दिसाङ्; वगैरे), पसरट उचार व आवाजाचा विशिष्ट चढउतार म्हणजेच, विशिष्ट हेल (उदा– कामुइ श्ता > कसॉआसा ह्याबाबतींत ह्या कोंकणीचें पोर्तुगीजशीं विलक्षण साम्य दिसत.

हें झालें अंतर्गत स्वरूपासंबंधीं भाषेच्या बाह्य स्वरूपाच्या संदर्भांत तर अनंत परिणाम दिसतात.

उदा– (अ) **नामें** :-

(१) "ताका बरें १ अॅ, (कोंकणी) प्ये १ अॅ न (पोर्तुगीज) जालें १ अॅ." (प्यॅन = शासन)

(२) "बरॅं कस्तांवू कॅलॅं म रॅ तूं". (भांडण)

(आ) क्रियापद :–

"ताका बरे १ अॅ बरो १अन ताणॅ त्रातार कॅलॉ."

(चालवणें वागणूक देणें)

याशिवाय विशेष नामें सामान्य नामें, वगैरेंच्या संदर्भांतहि पोर्तुगीज भाषेचा लक्षणीय असा परिणाम ह्या कोंकणीवर झालेला दिसतो.

(क) कारवार तें भटकळ, व पूर्वेस शिरसी –गिरसप्पा येथील गौडसारस्वत ब्राह्मणांची कोंकणी :–

"ह्या नाटकाचॉ पईल् प्रयोग आयुतारां दन् पारां १. दोन वाजतांनां (नां– अनुस्वाराचा अस्पष्ट उच्चार) जालॉ लोऽऑ. त्यां वॅळार् हजारभर लो१ कं आशिल्ल. हॉवं सुद्धां (अनुस्वाराचा उच्चार अस्पष्ट) त्यां प्रयोगाक् गॅल्लॉ. मज्बरोबरं नंगे। ग्ॅलॅं आणि चारपांच दोऽस्त आशिल्लॅ

(१) वरील (क) भाषा उच्चारांचे संदर्भांत गोमांतकीय कोंकणीपेक्षां कमी व सारस्वत ब्राह्मणांच्या कोंकणीपेक्षां अधिक पसरट आहे.

(२) गोमांतकीय कोंकणीनें परभाषेचे विशेष घेतले. परंतु हिनें संस्कृत व प्राकृत यांमधून निर्माण होऊन संस्कृतिकरणामधून घडलेल्या मराठीचेच विशेष अधिक घेतले. त्यामुळें गौडसारस्वतांच्या गोमांतकीय कोंकणीपेक्षां सारस्वतब्राह्मणांच्या कोंकणीला अधिक जवळ.

(३) द्वित्व व पर्यायानें stress, व आवाजांतील चढउतार कमी. त्यामुळें ही भाषा अधिक 'मराठी सदृश रूपामध्यें आढळते.

ह्यावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं कोंकणीचीं हीं जीं विविध रूपें आहेत त्यांमधील अंतर्गत लय ही वेगळी आहे. तसेंच, सारस्वत ब्राह्मणांच्या कोंकणीमधील लय ही वैदिक संस्कृतशीं जवळची आहे, तर गौड सारस्वत ब्राह्मणांच्या कोंकणीमध्यें वैदिक संस्कृतसमान लय ही जरी असली तरी त्याबरोबरच त्यांमध्यें इतर तत्कालीन देशी (मराठी) वा परदेशी (पोर्तुगीज) भाषेमधील लय ही मिसळली गेलेली आहे. अशाप्रकारें ह्या लयीच्या बाबतीमध्यें सारस्वतब्राह्मणांची भाषा ही उत्तरकालीन भाषांमधील लयीचें



अनुक्रमणिका








अनुकरण करणाऱ्या गौडसारस्वतांच्या कोंकणीपेक्षां निश्चितपणें पुराण आहे.

सारस्वतब्राह्मणांच्या कोंकणीपेक्षां गौडसारस्वतांची कोंकणी ही अधिक उत्तरकालीन आहे हें सिद्ध करून देणारें आणखी एक प्रमाण ह्या दोन भाषांच्या स्वरूपामध्यें सांपडतें; तें असें :—

वैदिकसंस्कृत ते देशी भाषा ही उत्क्रांति जर लक्षपूर्वक तपासून पाहिली तर दोन गोष्टी लक्षांत येतात.

(१) ह्या उत्क्रांतीमध्यें कठीण व क्लिष्ट उच्चार सोपे व सरळ करण्याची प्रवृत्ति ही दिसून येते. उदा– कृ > कर, उपानह > वहाण वगैरे. यामुळें एकतर शब्द हा दिवसानुदिवस लहान होत गेला व दुसरें म्हणजे त्यामधील जोडाक्षरें हीं कमी झालीं. आणि हें शब्दांमधील अक्षरांचें द्वित्व जसें कमी झालें तसा शब्दामधील अक्षरांवरील विविधस्वरूपाचा stress हि कमी झाला. आणि यामुळें उत्तरोत्तर भाषेंतील शब्दांचा उच्चार हा अधिकाधिक flat होत गेला, त्यामधील चढउतार कमी झाला.

(२) आणि दुसरें म्हणजे, ह्या उत्क्रांतीच्या मध्यकालीं शब्दांचा उच्चार हा सोपा करीत असतांना जेव्हां दोन स्वर एकत्र येत तेव्हां ते वेगवेगळे जोडून लिहिले जात असत. पुढें ते संधि करून मग लिहिले जाऊ लागले.

उदा०—

| | संस्कृत | महाराष्ट्री | महा. अपभ्रंश | मराठी (देशी) |
|---|---|---|---|---|
| (१) | प्रतिष्ठान > | पइष्ठान > | पइठाण > | पैठण. |
| (२) | चतूर्थ > | —— | चउत्थ > | चौथ. |

तेव्हां, वैदिक संस्कृत तें देशी भाषापर्यंतच्या उत्क्रांतीचें हें स्वरूप लक्षांत घेऊन मग जर सारस्वत व गौडसारस्वत ब्राह्मण ह्यांच्या भाषांकडे पाहिलें तर हाच फरक ह्या दोहोंमध्येंहि असल्याचें निदर्शनास आल्याशिवाय राहात नाहीं.

किंबहुना सारस्वतांच्या कोंकणीमध्यें ज्या ठिकाणीं प्राकृतच्या – निखळ प्राकृतच्या लकबी दिसतात त्याच ठिकाणीं गौड सारस्वतांच्या भाषेमध्यें मराठीच्या, म्हणजेच प्राकृतच्या उत्तरकालीन लकबी ह्या दिसतात.

उदा—

प्रथमचा आकडा सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी व पुनः तोच आंकडा गौडसारस्वत ब्राह्मणांची कोंकणी असें क्रमानें दिले आहेत. जिज्ञासूंनी यथाक्रम पडताळून पहाणेचें करावें.

( १ ) प्रथमा एकवचन : ‘ उ ’ [ देवु ]
अनेकवचनांत ‘ उ ’चा लोप होतो [ देव. ]

( १ ) प्रथमा एकवचन : ‘ अ ’ [ देव ]
‘ उ ’ क्वचित् होतो.
अनेकवचनीं : अ [ देव ]

( २ ) मराठी वा यादवकालीन मराठीमधील अन्त्य आ, ओ > ऑ. [ पैलॉ ]

( २ ) ‘ म ’. वा ‘या. का. म.’ मधील अन्त्य आ, ओ > ओ [ पैलो ] > ऑ अगदीं क्वचित्.
उदा – सामान्य नामें – तॉ, हॉ.

( ३ ) मराठी वा यादवकालीन मराठीमधील अन्त्य अ, अे > ॲ
[ ॲकळॅंची – अनुस्वाराचा उच्चार स्पष्ट ]

( ३ ) ‘ म ’ वा ‘ या. का. म.’ मधील अन्त्य अ, अे, > ॲ क्वचितच. बहुधा – अ > अे > ॲ होतो. परंतु अ, अे हि राहातात.
उदा – ॲकलॅंच, अेकलॅंच, ॲकलेंच व अेकलॅंच. [ अनुस्वाराचा उच्चार अस्पष्ट ]

( ४ ) आज्ञार्थी एकवचन : धातूला ‘ ई ’ प्रत्यय [ करी ]

( ४ ) आज्ञार्थी एकवचन : धातूला ‘ अ ’ प्रत्यय [ कर ]

( ५ ) प्रयोजक आज्ञार्थी एकवचन : धातूला ‘अई’ प्रत्यय [ करई ]

( ५ ) प्रयोजक आज्ञार्थी एकवचन : धातूला ‘ अय् ’ प्रत्यय [ करय् ]

( ६ ) “ + प्रत्यय = – ऐ – [ करैता ]

( ६ ) “ + प्रत्यय = ‘ अय् ’ च राहतो.
[ करय्ता ] उच्चार flat पसरट.

( ७ ) अनुस्वाराचा उच्चार स्पष्ट व त्यानंतर येणाऱ्या अ–कारी व्यंजनाचा उच्चार ऱ्हस्व ( स्वरविरहित ) उदा : सांग्ता ( अर्थ – सांगतो )







( ७ ) अनुस्वाराचा उच्चार अस्पष्ट व त्यानंतर येणाऱ्या अ- कारी व्यंजनाच्या ऐवजीं त्याचवर्गांतील अनुनासिकाचा उच्चार करण्याकडे प्रवृत्ति.

उदा : सांङ्ता.

( ८ ) stress जास्त. त्यामुळें द्वित्व फार होतें. उदा – कॅळ्ँ उल्हैता, वगैरे

( ८ ) stress फार कमी, त्यामुळें द्वित्व कमी होतें. उदा – कॅळें । कॅळँ, उलयुता. – उच्चार पसरट.

[ मराठीमधील 'म्हणून' शब्दाची व्युत्पत्ति : म्हणूं > म्हणून् > म्हणून : लक्षांत घेतां–– ]

( ९ ) [ म : म्हणून ] – म्हणूं
[ जुनें रूप ]

( ९ ) [ म : म्हणून ] – म्हणून्
[ उत्क्रांत रूप ]

( १० ) [ म : म्हणूनच ] –
म्हणूंत्रो । म्हणूं रे
[ प्रत्ययाचें । अव्ययाचें कार्य मात्रा करितात ]

( १० ) [ म : म्हणूनच ] –
म्हणूनच्
[ उत्क्रांत रूप ]

( ११ ) सप्तमी :–
आं, आन्तु, जेरी, री,
वैरी, चरी, भित्तरी

( ११ ) सप्तमी :–

आं, आंत् ( उच्चार पसरट व अनुनासिकाचा उच्चार अस्पष्ट ) जेर्, वैर् ( गोव्याच्या व कारवारच्या गौ. सा. ब्रा. ची कोंकणी ), वर् ( उत्तर कोंकणीचा संपर्क ) चेर्, र्, भीतर् [ मराठी रूप ]

( १२ ) वर्णसंयोगाच्या प्राकृत लकबीः
( अ ) ( सं. भगिनी ) > भइणी, भैणी.
( आ ) अपूर्वाई > अप्रुबाई

( १२ ) वर्णसंयोगाच्या प्राकृत लकबी + मराठीची, झालर, म्हणजेच उत्क्रांत रूप :

( अ ) ( सं. भगिनी ) > भईण ( > बहीण )
( आ ) अपूर्वाई > अप्रुबाय्
इत्यादि

अशाप्रकारें, सारस्वतांची एक कोंकणी व गौडसारस्वतांच्या कोंकणी भाषांचा समूह ह्यामध्यें निश्चित अशी एक संगति लागते. आणि म्हणूनच, कोंकणीचीं म्हणून वैशिष्ट्यें सांगत असतांना तीं दोन गटांनीं देणें प्राप्त होतें. उदा०–

## [ आजपर्यंत सांगितल्या गेलेल्या कोंकणीच्या [ अ ] नियमांच्या संदर्भांत [ ब ] सा.ब्रा. व [ क ] गौ. सा. ब्रा यांच्या कोंकणींतील भेद.

### [ अ ]

[ १ ] नासिक्य उच्चारण

[ २ ] व्यंजनान्त शब्द सांपडणें कठीण. 'अ' स्वर [ ऱ्हस्व ] जोडण्याची चाल. – पूत, केस, जण.

[ ३ ] श्वासयुक्त व्यंजनांतील श्वासाचा उच्चार नाहींसा करण्याकडे प्रवृत्ति. उदा :

बोइन [ भइण ], बाव [ भाऊ ], गेर [ घेर ].

[ ४ ] आरंभींच्या 'व' चा लोप होतो व केवळ स्वर राहातो. उदा : विस्कळ > इस्कळ.

[ ५ ] आरंभींचा ए व ओ > ये व वो
ऐ > आय
औ > आव

### [ ब ] – [ एक रूप ]

[ १ ] अनुनासिकाचा उच्चार स्पष्ट.

[ २ ] अ–कारान्त एकवचनी शब्दाचा उच्चार 'अ' चा लोप करून व्यंजनान्त करण्याचा प्रघात. बहुवचन करतेवेळीं 'अ' जोडला जातो. उदाः— ए. व. :– पूत, केस्... बहु. व :– पूत, केस , जणं [ वस्तुतः उच्चार : केसु ] [ वस्तुतः उच्चार : कॅस१ ] बहुवचनी 'अ' चा उच्चार इतका स्पष्ट कीं तो एका मात्रेनें लांबतो.

[ ३ ] Stress चें आधिक्य, त्यामुळें 'ह' जोडण्याची प्रवृत्ति –– ह्यामध्यें प्राकृतची लकब दिसते उदा : बहीण > भैण् । भइण् । भईण.

भाऊ > भावू [ उच्चार - भां १ वू ]








[ ४ ] आरंभींच्या 'व्' चा लोप अत्यंत अपवादात्मकपणें होतो. सहसा लोप होतच नाहीं. उलट कधीं कधीं जोडला जातो.

उदा : ओवतो > वॉवृता.
ओवून > ओन्नूं । वोन्नूं -- इत्यादि.

[ ५ ] [अ] - मधील नियम अपवादात्मकरीत्या दिसतो. एक > एकु, ॲकारी, ऍकळॉ इत्यादि. 'ये' सहसा होत नाहीं.

'ओ' चा 'वो' होत नाहीं. त्याऐवजीं -- (१) ओ चा लोप होतो; (२) 'व' होतो; 'ऊ' होतो. उदा : (१) ओशाळली > शॅळॅ। ळे ली. (२) ओखद > वक्कद. (२) ओली > वल्ली; ओवा > वॉवॉ, (३) ओवाळून > ऊवाळूनूं (४) 'ओ' तसाच राहतो. उदा : ओवून > ओन्नूं । वोन्नूं

ऐ व औ > आय् व आव्. पण त्यामुळें stress वाढतो.

[ क ] - [ अनेक रूपांचा समूह ]

[ १ ] अनुनासिकाचा उच्चार अस्पष्ट, परंतु उच्चार आहे.

[ २ ] एकवचन : कधीं 'अ' जोडतात तर कधीं नाहीं. परंतु standard कोंकणीशीं ( ब ) अधिक जवळ.

बहुवचन : अ जोडण्याची व त्याचा स्पष्ट उच्चार करण्याची चाल आहे.

[ ३ ] कांहींवेळा 'ह्' जोडण्याकडे तर कांहीं वेळां 'ह' नाहीसा करण्याकडे प्रवृत्ति. वेगवेगळ्या भाषेची वेगवेगळी छटा आहे.

[ ४ ] गोव्याच्या गौड सारस्वतांच्या कोंकणींत कांहीं प्रमाणांत तेथील खिश्चनांच्या कोंकणींत विशेषत्वानें आरंभीच्या 'व्' चा लोप करण्याची प्रथा आहे. [ अ ] मराठीच्या व उत्तरकोंकणीच्या संपर्कानें सिद्ध झालेल्या गौडसारस्वतांच्या कोंकणींत सहसा लोप होत नाहीं.

(५) ए > ये । ए [ एक । येक > एक ]
ओ । वो > व. [ ओखद > वोखद । वकद,
ओळखलें वळखलॉ ] *

यां सर्वांमधून एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे ह्या सर्व कोंकणीच्या रूपांपैकीं सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी ही स्वरूपतः अधिक प्राचीन आहे, तर गौड-सारस्वतांच्या कोंकणीच्या विविध रूपांनीं उत्तरकालीन देशी भाषांच्या लकबी व उत्तरकालीं ज्यांचा संपर्क पोहोंचला त्या परकीय भाषांच्या लकबी ह्या शब्दांबरोबरच आत्मसात् केलेल्या आहेत, आणि म्हणूनच त्या स्वरूपतः प्रकृतीनेंच उत्तरकालीन मानावयास हरकत नसावी.

ह्या ठिकाणीं असा एक प्रश्न विचारला जाण्याची शक्यता आहे. तो असा कीं, कोंकणीमधील विविध बोलींचीं प्रत्येक शतकांमधील लिखित रूपें हीं उपलब्ध नसल्याकारणानें आजच्या कोंकणीवरून प्राचीन कोंकणीची कल्पना करून त्याअन्वयें कोंकणीचें मूळ रूप शोधून काढण्यानें तिच्या इतर बोलींवर अन्याय होणार नाहीं काय ? केवळ तार्किकदृष्ट्या अशा स्वरूपाची शंका ही अनाठायी ठरत नसली तरी सुदैवानें कोंकणीच्या भाषाशास्त्रीय स्वरूपानेंच तिचें अर्धें उत्तर देऊन ठेविलेलें आहे.

कोणत्याहि भाषेवर उत्तरोत्तर उत्तरकालीन भाषांचे संस्कार हे अधिकाधिक होत जाणें अपरिहार्य आहे. आणि जरी कदाचित् मधल्या काळामध्यें तत्कालीन भाषांचे संस्कार त्या भाषेवर झाले असें गृहीत धरलें तरी पुढल्या काळामध्यें हे संस्कार संपूर्णपणें पुसून टाकले जाणें हें संपूर्णपणें अशक्य आहे. आणि म्हणूनच भाषेचें प्राचीनतम रूप दाखविणाऱ्या बोलीचें रूप हेंच त्या भाषेचें प्राचीन- मूळ रूप असें मानावयास हरकत नसावी. म्हणूनच, सारस्वतांची कोंकणी ही मूळ कोंकणी मानावयास हरकत नसावी.

आणि ह्यालाच दुसरें उत्तर म्हणजे ह्या दोनहि समाजांची भिन्न मनोवृत्ति होय ! भाषिक दृष्ट्या विचार करीत असतांना आपण असें पाहिलें कीं सारस्वत ब्राह्मण समाज हा आपल्या भाषेच्या पुरातन स्वरूपाला-कोणत्याहि काळामध्यें किंबहुना कोणत्याहि स्थळीं-चिकटून राहिलेला आहे; तर, गौडसारस्वत

* हा शब्द गौ. सारस्वतांनीं मराठींपासून घेतला असावा. हा शब्द standard कोंकणींत नाहीं. त्या ऐवजीं 'गुर्तु'-ओळख हा शब्द वापरला जातो. ऐ व औ > आय् व आव्. परंतु त्यामुळें वेगळा stress येत नाहीं.










ब्राह्मण समाज हें पुरातन वैशिष्ट्य संपूर्णपणें वेगळें होऊं न देतांहि उत्क्रांत देशी भाषा व परकीय भाषा यांच्यामधील कांहीं मौलिक तत्त्वें आत्मसात् करितो. हें जें ह्या दोनहि समाजांच्या मनांचें वृत्तिवैचित्र्य आहे, तें केवळ ह्या अंगानेंच नव्हे तर त्यांच्या संस्कृतीच्या प्रत्येक घटकामधून प्रत्ययाला येतें.

**धार्मिक :–**

**( अ ) कुलदैवतें :–**

सारस्वतब्राह्मण व गौडसारस्वत ब्राह्मण समाज ह्यांचीं कुलदैवतें पाहिलीं तर एक गोष्ट लक्षांत येते, ती अशी कीं, बहुतेक सारस्वत ब्राह्मण हे शैव आहेत. त्यामध्यें वैष्णव फारच कमी, आणि मुख्य म्हणजे, वैष्णव– म्हणजे कुलदैवत विष्णू– जरी झाले तरी ते शिवालाहि भजतात– नियमानें भजतात. तेव्हां, एकंदरींत हा जवळ जवळ संबंध समाजच शैव आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. आणि अशा ह्या समाजाचीं दैवतें म्हणजे आद्यदैवतें– मंगेश ( शिव ), शांतादुर्गा ( पार्वती ), महालक्ष्मी ( शक्ति ) व क्वचित् विष्णू हीं होत. अशाप्रकारें वेगळीं वेगळीं दैवतें जरी असलीं तरी त्यांठिकाणींहि एक विशिष्ट संगति आहे. आणि ती त्यांच्या कुलदैवताचें दर्शन घेण्याच्या विशिष्ट प्रथेमधून हग्गोचर होते.

ह्या समाजाची एक प्रथा आहे. ज्यांचें कुलदैवत शांतादुर्गा वा महालक्ष्मी ते त्या दैवताचें दर्शन घेतल्यानंतर पुढें मंगेशाचें दर्शन घेतल्याखेरीज जात नाहींत. आणि ज्यांचें कुलदैवत मंगेश, ते सुद्धां मंगेशीच्या देवालयांतीलच कां होईना परंतु प्रथम महालक्ष्मीचें दर्शन घेतात, मग मंगेशाचें दर्शन व मग पुढें इतर दैवतांचें दर्शन घेतात. ही प्रथा नुसतीच ‘ प्रथा ’ नाहीं तर ती तशीच कटाक्षानें पाळली जाते, पाळावी लागते. म्हणजे कुलदैवत कोणतेंहि असो, प्रथम शक्तीचें दर्शन घ्यावयाचें आणि मग परमतत्त्वाकडे जावयाचें. आज हा केवळ संकेत आहे. परंतु एकेकाळीं ह्या संकेतामागेंहि विशिष्ट अर्थ, विशिष्ट तत्त्व, विशिष्ट विचार हा असणारच ! तो असा लावितां येईल. शिव-पार्वती व विष्णू-लक्ष्मी म्हणजे परमेश्वर– माया, प्रकृति-पुरुष, परब्रह्म– शक्ति, होय. तेव्हां दर्शन ज्या कुलदैवताचें घ्यावयाचें तें म्हणजेच परब्रह्माचें सगुण रूप, हें कोणतेंहि असो. परमेश्वराचें दर्शन घेत असतांना प्रथम प्रकृतीचें– मायेचें– शक्तीचें दर्शन घ्यावयाचें व मग परमतत्त्वाचें– शिवाचें वा विष्णूचें दर्शन घ्यावयाचें. पुढें वारकरी संप्रदायाच्या संदर्भांतहि आपल्याला दिसतें कीं ज्ञानेश्वर काय किंवा इतर संत काय, यांनीं संसार मिथ्या मानला नाहीं, संसारत्याग करा असें सांगितलें नाहीं. किंबहुना संसारामध्यें राहून साधना करूं इच्छिणाऱ्यांसाठीं कर्तव्यपालनाची जोड देऊन नामभक्ति दिली. परंतु अशाप्रकारें हा ‘ सोपा ’ मार्ग देत असतांनाच, कर्तव्यपालन करीत असतांना जी वृत्ति असावी, तिला अत्यंत महत्त्व दिलेलें आहे; व त्यावरच परिणामी श्रेयसाचें अस्तित्व अवलंबून आहे असें सांगितलें आहे. किंबहुना, संतांनी राजस व तामस नित्यबद्ध दैवतांच्या भक्तीचा पुरस्कार केला नाहीं तरी परमतत्त्वाच्या विविध सगुण रूपांच्या भक्तीचे ते विरोधक नव्हते. परंतु ह्या विविध रूपांच्या उपासनेमधून एका परमतत्त्वाची, अद्वैतरूपाची जाण निर्माण होणें, ह्या सगुणरूपाच्या भक्तीमधूनच निर्गुण, निराकार परमतत्त्वाचा साक्षात्कार होणें ह्याला त्यांनीं महत्त्व दिलें होतें. प्रकृतिपुरुष संबंधाविषयींचा अशाच स्वरूपाचा विचार वैदिक तत्त्वज्ञानामागें आहे. आणि अशाच प्रकारचा तत्त्वविचार ह्या संकेतामागे नसेल कशावरून ?

त्याउलट, गौडसारस्वत ब्राह्मणांमध्यें कांहीं शैव आहेत, कांहीं वैष्णव आहेत; परंतु, बहुसंख्यांचीं कुलदैवतें हीं आद्यदैवतांपेक्षां नंतरचीं, म्हणजे बरेचवेळां पुराणकालीन दैवतें आहेत. किंबहुना, ज्यांना नित्यबद्ध देवता असें संबोधिलें जातें असें म्हाळसेपासून तें कोणतेंहि दैवत हें त्यांचें कुलदैवत असूं शकतें.

एकंदरींत असें दिसतें कीं धार्मिक बाबतींत, मग तो कुलदैवतांचा प्रश्न असो वा आचारविचारांचा असो, सारस्वत ब्राह्मण हे वैदिक संस्कृतीशीं जितके जवळचे आहेत तितके गौडसारस्वत ब्राह्मण नाहींत; तर, त्यांनीं पुढील नवपरिचित गोष्टींचा आपल्या तत्त्वांशीं समन्वय साधला.

**सामाजिक**

एकंदर सामाजिक इतिहासाकडे पाहिलें असतां असें दिसतें कीं हे राजकीय वा सामाजिक क्षेत्रांतील वैचारिक क्रांतीमध्यें सारस्वत ब्राह्मण हे सहसा भाग घेतांना










दिसत नाहींत. ते धर्माला आणि केवळ धर्माच्या अभ्यासाला व विचाराला-मननाला वाहिलेले दिसतात. ह्या एका क्षेत्रामध्यें- धार्मिक क्षेत्रामध्यें-सुद्धां वैचारिक क्रांतीशीं त्यांचा आणि वैचारिक क्रांतीचा त्यांच्या जीवनाशीं कांहीं फारसा संबंध आल्याचें दिसत नाहीं. मूळ वैदिक धर्म, त्याचें तत्त्वज्ञान, तदन्तर्गत श्रद्धा यांचा अभ्यास, पुरस्कार व त्याची जोपासना हा त्यांचा जणु धर्मच बनला आहे. तर गौडसारस्वत हे त्या दृष्टीनें इतके एकाकी नाहींत. विशेषतः गोव्याकडील गौडसारस्वत हे अनेकवेळां अनेक वैचारिक वा अन्य क्रांतीशीं निगडित असल्याचें दिसून येतें.

## वाङ्मयीन

वाङ्मयीन क्षेत्रामध्यें सुद्धां सारस्वतब्राह्मण हे एकान्त-केवळ धार्मिक अशा- स्वरूपाचें वाङ्मय निर्माण करितांना दिसतात. त्यांतूनहि वैदिक तत्त्वज्ञानाशीं अत्यंत जवळची अशी अत्यंत निर्लेप, निःसंग अशा-प्रकारची एक जाणीव सतत व्यक्त होतांना दिसते. उदा — रमावल्लभदासाचें लेखन. तर, गौडसारस्वत-ब्राह्मण हे ह्याखेरीज इतर उत्क्रांत झालेले वा इतर संस्कृतींच्या संगानें घेतलेले धर्मविषयक विचार व्यक्त करितांना दिसतात. किंबहुना त्या लोकांनीं धर्मविषयक जाणीव व्यक्त करण्याखेरीज अन्य स्वरूपाचें लेखनहि केल्याचें दिसतें.

हा जो सारस्वत ब्राह्मण व गौडसारस्वत ब्राह्मण यांच्यांमधील सांस्कृतिक भेद हा केवळ असा वरवरचा नाहीं. त्याच्या पाठीशीं त्यांची वृत्ति आहे. जुन्या, आदर्श म्हणून मानलेल्या निःसंग, 'शुद्ध' व अत्युच्च अशा तत्त्वाला चिकटून राहाणारी अशी एक वृत्ति आहे. तर दुसरी इतरांकडे पाहून त्यांच्यामधील जें श्रेष्ठ, आवडेल तें घेऊन आत्मसात् करणारी, संकर होण्यास – करण्यास तयार असणारी वृत्ति.

एकंदरींत असें म्हणतां येईल कीं सारस्वतब्राह्मणांची भाषा–संस्कृति ही वैदिक धर्माशीं अत्यंत निकटची, एका विशुद्ध रूपांत आढळते, तर, गौडसारस्वत-ब्राह्मणांची भाषा व संस्कृति ही प्रथम वैदिककाळां-नंतर येणाऱ्या थोड्याशा उत्क्रांत स्वरूपाशीं, आणि नंतर, ज्या ज्या निरनिराळ्या भाषा–संस्कृति व आचारविचार यांच्याशीं तिचा निकटचा संबंध आला त्या त्या गोष्टींशीं झालेल्या, किंबहुना होऊ दिलेल्या संकरामधून घडलेली अशी आहे. ह्याच वृत्तीच्या व इतिहासाच्या – अनुरोधानें सारस्वत व गौडसारस्वत ह्या जातिदर्शक शब्दांचाहि अर्थ लावितां येण्यासारखा आहे.

हे दोनहि शब्द प्रथम सारस्वत आहेत. त्याप्रमाणेंच हे सर्व लोकहि प्रथम सारस्वत – सरस्वतीचे - सरस्वतीचें जें देणें त्याच्या विशुद्ध मूल रूपाचे-वैदिक ग्रंथ, वाङ्मय, तदन्तर्गत तत्त्वज्ञान, आचारविचार इत्यादींचे – उपासक आहेत. असे हे सारस्वत काश्मीरमार्गें हिंदुस्थानामध्यें आले. पुढेंहि ज्यांनीं ह्या मूळ शुद्ध स्वरूपाची जोपासना केली ते सारस्वतब्राह्मण. मग 'गौड' हा शब्द कां व कसा आला असावा ?

'गौड' ह्या शब्दाचा अर्थ दोन प्रकारें लावितां येण्यासारखा आहे—

(१) गौड ह्या शब्दाची व्युत्पत्ति व ज्या लोकांच्या संदर्भांत हा शब्द वापरला त्यांची मनोवृत्ति यांच्या प्रकाशांत ह्या संदर्भांत एक तर्क करितां येतो. तो असा : बंगालला गौड देश असें म्हणत असत. मंत्रतंत्रादि गूढ विद्या ह्या प्रामुख्यानें येथील लोकांना अवगत होत्या. ह्यावरूनच प्राचीनकाळीं 'गौडबंगाल हा शब्द आला [कृ. पां. कुलकर्णी यांचा व्युत्पत्तिकोष] ह्या शब्दाचा अर्थ – मसलत, कारवाई असा आहे. किंबहुना जेथें एखाद्या गोष्टीची अन्य गोष्टींशीं सरमिसळ होते, गुंतागुंत होते त्याठिकाणीं ह्या शब्दाचा प्रयोग केला जात असतो. हा अर्थ थोडासा ताणून, व्यापक अर्थानें, असें म्हणतां येईल कीं गौड म्हणजे "कशाच्यातरी आत्मसात् करण्यानें, संपर्कानें, हेतुपूर्वक वा निर्हेतुकपणें, मूळ वस्तूचें बदललेलें रूप, जें शुद्ध राहिलें नाहीं तें रूप." त्याचप्रमाणें थोडेंसें पुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं, सुरुवातीला केवळ सारस्वत ब्राह्मण असावेत व कालांतरानें, त्यांच्यापैकीं कांहींजणांनीं जेव्हां त्यांच्याशीं ज्या ज्या संस्कृतीचा–भाषेचा संबंध आला त्यांच्याशीं आपल्या संस्कृतीचा–भाषेचा संकर होऊं दिला, तेव्हां ज्यांनीं मूळ रूपाची जोपासना केली त्यांनीं एकत्र येऊन इतर – मूळरूपांत बदल करणाऱ्यांना गौडसारस्वतब्राह्मण ह्या नांवानें संबोधावयास सुरुवात केली. गौडसारस्वतांमध्येंहि पांच वर्ग आहेत म्हणूनच









अनुक्रमणिका

त्यांना पंचगौडहि म्हणतात. परंतु पूर्वसारस्वत ब्राह्मणांच्या दृष्टीनें सर्व पंचगौड हे एकाच माळेंत बसतात. हे सर्व गौडसारस्वत ब्राह्मण होत. त्यांनीं जें आत्मसात् केलें तीं संकराचीं तत्त्वें हीन होतीं असें नाहीं. परंतु, हीं निरनिराळ्या संस्कृतीचीं वा भाषेचीं प्राकृतिक लक्षणें आत्मसात् केल्यानें मूळ रूप बदलतें, व तें बदललें कीं त्याचें म्हणून जें शुद्धत्व, त्याला बाध हा आलाच !

( २ ) दुसरी उपपत्ति अशी :

गौडसारस्वतांनीं स्वतःच्या समाजासंबंधी जें सांगून ठेविलेलें आहे तें असें कीं सारस्वत–म्हणजेच आर्यांमधील विशिष्ट जमात–जेव्हां काश्मीर मार्गें हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांपैकीं कांहीं तेथेंच स्थाईक झालें, तर कांहीं पूर्वेस बंगालमध्यें गेले व कांहीं दक्षिणेस गोव्याच्या परिसरांत गेले. परंतु, ह्याठिकाणीं, गौडसारस्वत त्या काळांत नसावेत ह्याचा स्पष्ट पुरावा म्हणजे, काश्मीरमध्यें सारस्वत आहेत. परंतु गौडसारस्वत नाहींत. असो. तेव्हां दक्षिणेकडे आलेले सारस्वत गोव्याच्या रम्य परिसरामध्यें स्थाईक झाले व तेथेंच त्यांनीं आपलीं देवालयेंहि बांधलीं. जे पूर्वेकडे गेले ते कालांतरानें पुन्हां दक्षिणेंत आले. हें इतिहाससिद्ध आहे. आणि ह्याला दुसरा पुरावा म्हणजे, गोव्यामध्यें, ' गांडबंगाल ' नांवाचें एक दैवत आहे. त्याचें स्वरूप साधारणपणें महाराष्ट्रीय म्हसोबाप्रमाणें आहे. त्याचें स्वतंत्र देऊळ नाहीं, त्याची मूर्ति नाहीं. आणि विशेष म्हणजे बंगालमधील देवाचा– कालीचा वगैरे– ज्याप्रकारचा नैवेद्य असतो त्याचप्रकारचा नैवेद्य ह्या देवालाहि असतो. हा देव म्हणजे कोणाचेंहि कुलदैवत नव्हे. तें एक दैवत आहे. आणि ह्याचें पूजन फक्त गोव्याच्या गौडसारस्वतांकडून होतें. तेव्हां हें ' गौडबंगाल ' दैवत म्हणजे बंगाली संस्कृतीकडून घेतलेल्या वैशिष्ट्यांचें एक दृश्य गमक होय. तेव्हां, प्रथम बंगालमध्यें स्थाईक झालेले हे आर्य-सारस्वत ते तेथे स्थाईक झाले तेव्हांपासून किंवा ते तेथील संस्कृतीचे विशेष आत्मसात् करून पुन्हा दक्षिणेंत आले; तेव्हांपासून बहुधा गौडसारस्वतब्राह्मण ह्या नांवानें ओळखले जाऊं लागले असावेत. अशाप्रकारें हे सारस्वत व गौडसारस्वत दक्षिणेंत प्रथम आले ते गोव्याच्या परिसरांत. पुढें जेव्हां गोव्यामध्यें पोर्तुगीज आले तेव्हां सारस्वत ब्राह्मण हे गोमांतकामधून दक्षिणेस कारवार–मंगलूर पर्यंत, आग्नेयेस बेंगळूरपर्यंत व गोमांतकाच्या पूर्वेस निघून गेल्याचे स्पष्ट उल्लेख आहेत. किंबहुना त्याकाळीं कांहीं गौडसारस्वतहि गोमांतकामधून बाहेर पडलेले दिसतात. परंतु पोर्तुगीजांच्या आगमनापूर्वीच बंगालमधून हे गौडसारस्वत ज्यावेळीं गोमांतकामध्यें आले. कदाचित् त्यावेळेपासूनच आपल्या पुराण आदर्शभूत कल्पनांना – संस्कृतीला जपणारे हे सारस्वत ब्राह्मण आपलें मूळ स्थान सोडून आसपासच्या प्रदेशांत जाऊं लागले असण्याची शक्यताहि आहे.

एकंदरीत, हे जे बदलाचे टप्पे, किंवा कोंकणीचा उगम, कोंकणी बोलणाऱ्या समाजाचें मूळस्थान, त्यांचा प्रसार, त्यांच्या भाषेमध्यें झालेला बदल, इत्यादींचा क्रम कोणता, त्यामागील कालानुक्रमें कारणें कोणतीं, त्या बदलाच्या टप्प्यांचा काळ कोणता असावा वगैरे, हे सर्व स्वतंत्र प्रश्न आहेत. परंतु एवढें मात्र खरें कीं आज जें एकंदर सारस्वत समाजाचें व त्याच्या भाषेचें स्वरूप आहे त्यामधील विविधता लक्षांत घेऊनहि, त्यांच्या जातीचें नांव, स्थूलमानानें त्यांची वृत्ति, संस्कृति, आचारविचार, धर्म व भाषा यांच्यामध्यें एक विशिष्ट संगति दिसून येते. तेव्हां, ह्या स्वरूपावरून असें म्हणावयास हरकत नाहीं कीं ही जी सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी भाषा, ती मूळ कोंकणी, व तीच कोंकणीच्या ह्या सर्व रूपांमधील प्राचीन होय. व ह्या कोंकणीचा जेव्हां इतर संस्कृतींशीं-भाषांशीं निकटचा असा संबंध आला व त्यांच्याशीं तिचा वेगवेगळ्या प्रमाणांत संकर झाला तेव्हां हीं कोंकणीचीं इतर रूपें अस्तित्वांत आलीं, सिद्ध झालीं. तेव्हां, भाषाशास्त्रीय दृष्ट्या सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी ही मध्यवर्ती व इतर तिच्या सभोंवतालच्या बोली असें मानावयास हरकत नाहीं.

तेव्हां, एकदां सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी ही प्राचीन–मध्यवर्ती मानल्यावर कोंकणीच्या उत्पत्ती-संबंधीं, उत्क्रांतीसंबंधीं व तिच्या मराठीशीं असणाऱ्या संबंधाविषयीं आपण विचार करूं लागलों म्हणजे एक गोष्ट झटकन् लक्षांत येते. ती म्हणजे, यादवकालीन मराठी व कोंकणी यांमधील साम्य ही होय. यादव-










कालीन मराठी म्हणत असतांना ज्ञानेश्वरीची भाषा प्रमाण मानल्यास एक आक्षेप घेतला जाण्याची शक्यता आहे. तो असा कीं ज्ञानेश्वरीची भाषा ही शिष्ट, ग्रांथिक, संस्कृतच्या वैशिष्ट्यांनीं सकस झालेली अशी आहे. तेव्हां एका संस्कृतनिष्ठ शिष्ट भाषेची एका बोलीशीं तुलना करणें उचित होणार नाहीं. एका मर्यादेपर्यंत हें खरें आहे. कारण, ज्ञानेश्वरींतील मराठी ही 'संस्कृतीकरणानें' सकस झालेली असली तरी त्याबरोबरच तिचें स्वरूप खऱ्या अर्थानें 'मराठा बोलु' आहे. तेव्हां तीमधील देशी शब्दांचा विचार हा कोंकणीचें स्वरूप समजून घेतांना करण्यास हरकत नसावी. परंतु यादवकालीन मराठी बोलीचें अविकृत स्वरूप म्हणून लीळाचरित्रांतील भाषा किंवा चक्रधरोक्त सूत्रांची भाषा प्रमाण मानल्यास तें अपवादात्मक होईल असें म्हणतां येणार नाहीं.

ह्या दोनहि भाषांच्या स्वरूपांमध्यें जे साम्य आहे तें शब्दांमध्यें आहे, शब्द वापरण्याच्या विशिष्ट पद्धतीमध्यें आहे, प्रत्ययांच्या संदर्भात आहे, आणि विशेष म्हणजे, शब्द उच्चारण्याच्या विशिष्ट लकबी-मध्यें – शब्दांमधील अंतर्गत लयीमध्येंहि आहे. कांहीं ठराविक पद्धतीनें यादवकालीन मराठीमध्यें बदल केले असतां सारस्वत ब्राह्मणांच्या कोंकणीचें रूप सिद्ध होतें.

उदा —

**यादवकालीन मराठी (या. म.) > कोंकणी (सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी)**

(१) या. म : स्वातंत्र्यू हा मोक्षः पारतंत्र्यू हा बंधः माया बहिणी आशंसिती ।

को : स्वातंत्र्यू हॉ मोक्षु : पारतंत्र्यू हॉ बंधु : माया भैणीक आशेताती ।

(२) या. म : परमेश्वरालागी : रंका होआवें : ना तरि आपणया सांगातें. भिक्षे नेइजे ।

कों : परमेश्वरालाग्गी : रंकु जाऊं का : ना तरि (= ना जाल्यारी) आपणासांगाती भिक्षे हॉरका ।

(३) या. म : भणौनि चुके : ऐसें भणिलें ।

को : म्हणूं चुक्ता : अश्शी म्हलॅं ।

(४) या. म : ज्ञान मोचक ।१। नित्य व्यापकु परमेश्वरु ।२। अप्रमेयु ।३। अनिमित्तबन्धु ।४। अनाथ-नाथु ।५। कृपाळु ।६। आर्तदानी ।७। परमेश्वरु सेव्यो : जीवु सेवकु ।८। विरुद्धाधर्मी समावेश ईश्वरींची आति ।९। आपण करीना आणिका करवीं करवीना : करितां तरि सकळ हि देखे : तो साक्षी बोलिजे ।१०।

कों : ज्ञान मोचक (आस्स) ।१। नित्यु व्यापकु परमेश्वरु : परमेश्वरु नित्यु व्यापकु आस्स ।२। (तॉ) अप्रमेयु (आस्स) ।३। (तॉ) अनिमित्तबन्धु (आस्स) ।४। (तॉ) अनाथनाथु (अनाथांगॅलॉ । गलॉ नाथु) (आस्स) ।५। (तॉ) कृपाळु (आस्स) ।६। आर्त-दानी (आर्तांगॅलॉ । गलॉ किंवा आर्तांक । आर्तां लाग्गी दानी आस्स) ।७। परमेश्वरु सेव्यु : जीवु सेवकु ।८। विरुद्धाधर्मी (–धर्मान्तु) समावेशु ईश्वरा - गॅलॉ । गलॉ आस्स ।९। आप्पणऽ कर्‌ना आनिका (=आणिका) करौनु करैना : कॅर्लॅं तरि सगळॅंई दॅक्क्‌ता (=पळैता) : तॉ साक्षी (अश्शी) उल्लैताती (=म्हणताती) ।१०।

(५) या. म : दिशा – पैलदिशे ... ऐलदिशे ...
कों : दीक – पइल् । पेल्दीक ... अइल । आल्दीक

(६) या. म : देखिलें = देखणें – पाहाणें.
कों : दे । दॅक्कूलॅं [उदा- उतारा क्र. ४ (१०)]

ह्या दोन रूपांमधील जें साम्य आहे तें दोन प्रकारचें आहे.

(१) संस्कृतचें ऋण

(२) प्राकृत विशेष.

आणि यामधूनच कोंकणी – मराठी संबंधांविषयींचीं दोन मतें तयार झालेलीं दिसतात.

मराठी आणि कोंकणी ह्या दोनहि भाषांचा संस्कृत-पासूनच-वैदिक संस्कृतपासूनच-उद्‌भव झालेला आहे. आणि म्हणूनच, ह्या दोनहि भाषांची प्राकृतिक आणि बाह्यदृष्ट्याहि, घडण ही बरीचशी संस्कृतच्या वळणाची आहे. परंतु त्यामध्येंहि आपण असें पाहिलें, कीं कोंकणीमधील संस्कृतचीं वैशिष्ट्यें हीं वैदिक संस्कृत-पासून घेतलेलीं आहेत; तर, मराठीमधील संस्कृतचीं वैशिष्ट्यें हीं वैदिक संस्कृतपेक्षां उत्तरकालीन पुराण-संस्कृतशीं अधिक जवळचीं आहेत हें सर्वमान्य आहे. आणि म्हणूनच, असें म्हटलें जातें कीं मराठी ही वैदिक संस्कृत > पुराण संस्कृत > महाराष्ट्री > अपभ्रंश



अनुक्रमणिका






> मराठी अशा टप्प्यांनीं उत्क्रांत झाली; तर, कोंकणी ही वैदिक संस्कृत-पासून स्वतंत्रपणें निर्माण झाली.

त्याबरोबरच, ह्या दोनहि भाषा संस्कृतपासून आलेल्या असल्यामुळें संस्कृतचें म्हणून जे विशेष त्यांच्यामध्यें उतरले त्या संदर्भांत बऱ्याचशा प्रमाणांत, आणि कांहीं प्राकृत लकबींच्या संदर्भांत, आणि अर्थांतच, बऱ्याचशा शब्दांच्या संदर्भांत ह्या दोनहि भाषांमध्यें खूपसें साम्य आहे. त्याबरोबरच कोंकणीमध्यें लिखित ग्रंथ–वाङ्मय हें जवळ जवळ नाहींच. आणि म्हणूनच, कोंकणी ही मराठीची एक बोली असेंहि एक मत मांडलें जातें.

परंतु मराठीचें आजचें किंबहुना प्रगत संपूर्ण विकसित रूप व कोंकणी यांच्यामधील साम्यानें कोंकणी ही मराठीची बोली असें रोखठोक उत्तर काढतां येत नाहीं. ह्या दोघींचे त्यांच्या त्यांच्या उत्क्रांति-मार्गांतील व पर्यायानें आजचे संबंध लक्षांत घ्यावयाचे असतील तर कांहीं गोष्टी लक्षांत घेणें आवश्यक आहे.

एका भाषेची दुसरी भाषा बोली असते म्हणजे एक भाषा स्वयंपूर्ण व संपूर्ण स्वरूपांत सिद्ध झाल्यावर-तिला 'भाषा'रूप प्राप्त झाल्यावर, ती भाषा बोलणारे कांहींजण अन्य भाषांच्या संगानें त्यांचीं कांहीं ठळक वैशिष्ट्यें आत्मसात् करितात; त्यामुळें त्यांच्या भाषेला एक थोडेंसें वेगळें रूप प्राप्त होतें; आणि मग, अशा वेळीं ही बदललेली भाषा पहिल्या भाषेची बोली होते. तेव्हां मराठीच्या संदर्भांत बोलायचें झालें तर असें म्हणतां येईल कीं मराठी भाषेनें आपलें स्वतःसिद्ध रूप घेतल्यावर इतर भाषांमुळें जेथें जेथें तिला विविध वळणें मिळालीं तेथें तेथें तिच्या एकेक बोली तयार झाल्या. उदा– उत्तर कोंकणी, खानदेशी, अहिराणी वगैरे वगैरे.

परंतु मराठी-कोंकणी यांचा संबंध ह्याहून थोडासा वेगळा आहे.

ह्या दोनहि भाषा एका वैदिक संस्कृतपासून प्रगत झाल्या हें खरें. परंतु १३ व्या शतकामधील मराठीचें रूप हें 'वैदिक संस्कृत तें अपभ्रंश अशा टप्प्याटप्प्यांनें उत्क्रांत होत आलेल्या भाषेच्या रूपाच्या 'संस्कृतिकरणा'नंतर सिद्ध झालेलें आहे. आणि हें जें महाराष्ट्री व अपभ्रंश, म्हणजेच, प्राकृत लकबींचें 'संस्कृतिकरण' झालें तें पुराण संस्कृतच्या रुपानें केलें, वैदिक संस्कृतरूपानें नव्हे. आणि म्हणूनच, ह्या संस्कृतिकरणाच्या पूर्वकाळामधील मराठीच्या अगदीं सुरुवातीचें जें रूप आहे तें प्राकृतशीं अधिक जवळ आहे. परंतु ह्या प्राकृतभाषा–सुद्धां उद्भवल्या वैदिक संस्कृतपासूनच ! तेव्हां ह्या अशा प्राकृतमय मराठीचें पूर्वरूप हें पुराण-संस्कृतपेक्षां वस्तुतः वैदिक संस्कृतलाच अधिक जवळ आहे.

आणि कोंकणीचें ( मूळ मध्यवर्ती सारस्वत ब्राह्मणांची कोंकणी ) स्वरूपहि ह्या संस्कृतिकरणानंतर सिद्ध झालेल्या मराठी रूपापेक्षां प्राकृतकाळ व संस्कृतिकरणाचा काळ यांमधील काळामधील मराठीशींच खरोखर जवळ आहे, कारण कोंकणीमधील संस्कृत वैशिष्ट्यें हीं वैदिकसंस्कृतचीं आहेत; आणि प्राकृतचीं वैशिष्ट्यें हीं संस्कृतिकरणाच्या पूर्वींचीं आहेत.

आणि म्हणूनच, कोंकणी ही वैदिकसंस्कृतपासून स्वतंत्रपणें प्रगत झाली किंवा ती मराठीची एक बोली आहे असें म्हणण्यापेक्षां आज जो समाज कोंकणी बोलतो व जो समाज मराठी बोलतो त्यांची भाषा मराठी, किंबहुना, सर्व देशी भाषांच्या उत्पत्तिकालाच्या–प्रारंभकालाच्या दोन किंवा तीन शतकें पूर्वी एकच असावी, व पुढें त्यांचा जो विकास झाला तो मात्र वेगळा स्वतंत्रपणें झाला असें म्हटल्यास अधिक न्याय्य ठरेल. त्या बरोबरच, अशाप्रकारें अनेक शतकें एकत्र चालत आलेली ही भाषा, हिला चौथ्या-पांचव्या शतकानंतरच फांटे कां फुटले असा एक प्रश्न येथें उभा राहतो. आणि या ठिकाणींच सारस्वत व मराठी समाजामधील इतिहाससिद्ध अशा एका महत्त्वाच्या वृत्तिवैधर्म्याचा निर्देश करणें आवश्यक आहे.

सारस्वत ब्राह्मणांची वृत्ति ही पहिल्यापासूनच थोडीशी एकाकी, समाजांत पुढें येऊन कांहीं करावें, आपल्या सभोंवतालीं जें दिसतें त्याचें निरीक्षण करून त्यांतील जें श्रेष्ठ, अनुकरणीय, त्यामध्यें मिसळून जावें ही वृत्ति त्यांच्यामध्यें सहसा दिसत नाहीं. त्यामुळें सर्व बाबतींत ते, आदर्शभूत अशा जुन्या वैदिकरवाला चिकटून राहिले. त्यांचें वाचन व त्यांच्या धर्मविषयक कल्पना ह्या वैदिक वाङ्मय व तदन्तर्गत कल्पना यांभोंवतीं सारख्या रुंजी घालीत राहिल्या. त्यामुळें त्यांच्या

संस्कृतीवर, मनावर, आचारविचारांवर, किंबहुना भाषेवरहि जे संस्कार झाले ते विशेषत्वानें वैदिक संस्कृतचेच झाले. आणि म्हणूनच, पुढें अपभ्रंशाचें जें संस्कृतिकरण झालें त्यावेळीं मराठी समाजानें, किंवा, पुढें जो समाज ' मराठी ' ह्या नांवानें ओळखला जाऊं लागला त्या समाजानें प्राकृत व वैदिक संस्कृत यांच्या जोडीला पौराणिक आणि त्यानंतरच्या इतर संस्कृतींचें ऋणहि घेतलें; तर ह्या एकाकी वृत्तीच्या समाजानें दरवेळीं वैदिकसंस्कृतलाच केवळ जवळ केलें – तिचेंच ऋण आधिक्यानें घेतलें. अर्थात्, हीच वृत्ति पुढेंहि राहिली. आणि मराठी समाज विविध भाषांचें ऋण घेत वैचारिक अंगानेंहि आपली प्रगति करून घेऊ लागला, तर ह्या एकाकी वृत्तीच्या सारस्वतांनीं विशेषतः वैदिकसंस्कृत, त्याच कल्पना, ह्या सर्वांचा एक कोट संस्कृतिकरणाच्या काळामध्येंहि आपल्या भोंवतीं उभा केला आणि इतरांचा फारसा संपर्क होऊं न देतां आपलें स्वतंत्र विश्व निर्माण केलें, व तें अबाधित ठेवण्यासाठीं धडपड केली. आणि म्हणूनच मराठी भाषा ही अधिकाधिक बदलत, विचारांना अनुकूल अशा प्रकारें सुटसुटीत गद्य रूप घेऊं लागली – तिच्यामधील stress व लय कमीकमी होत गेली; तर सारस्वतांनीं मात्र वैदिकसंस्कृतचा व्यासंगच अखंड ठेवल्यामुळें कोंकणीमध्यें ह्या दोहोंचें प्रमाण दिवसेंदिवस वाढत गेलें; आणि अशाप्रकारें ह्या संस्कृतिकरणाच्या काळापासून कोंकणी व मराठी हे दोन प्रवाह थोड्याशा भिन्न स्वरूपांत वाहूं लागले.

पुढें सारस्वत – गौडसारस्वत वेगळे पडूं लागले, त्यापैकीं कांहींनीं अन्य संस्कृतींचीं – भाषांचीं तत्त्वें आत्मसात् केलीं, व त्या स्वरूपानुसार त्या प्रमाणांत त्यांच्या संस्कृतीचें – भाषेचें रूप हें थोडेंसें बदललें.

संस्कृतिदृष्ट्या सारस्वतब्राह्मण आणि गौडसारस्वत ब्राह्मण यांच्यामध्यें श्रेष्ठ कनिष्ठ असा भेद आहे असें नाहीं. कोंकणीच्या अनंत रूपांपैकीं ( वर्णांनुसारी भेद, धंद्यानुसार वगैरे ) सारस्वत व गौडसारस्वत ब्राह्मण हे शिष्ट व त्यांच्या भाषा ह्याहि विविधरूपी परंतु शिष्टमान्यच होत. तेव्हां त्यांच्यासंदर्भांत श्रेष्ठकनिष्ठत्वाचा प्रश्नच संभवत नाहीं. परंतु, भाषिक दृष्ट्या, सांस्कृतिक दृष्ट्या, परंपरेनें, सारस्वत ब्राह्मणांची संस्कृति व भाषा यांचें रूप हें अविकृत मूळ रूप ठरतें. आणि म्हणूनच, हेंच रूप मध्यवर्ती–प्रमाण मानलें जावें, व मग कोंकणीचा मराठीशीं, किंबहुना, एकंदर देशी भाषांशीं असणारा संबंध तपासून ठरवावा असें म्हटल्यास तें आग्रही ठरूं नये.










प्रा. गोवर्धन पारीख

# एक शैक्षणिक समस्या

[ गेल्या डिसेंबर महिन्यांत कानपूर येथें भरलेल्या अ. भा. शिक्षण परिषदेच्या "विश्वविद्यालयीन शिक्षण" या विभागाच्या अध्यक्षीय भाषणांतील कांहीं भागाचा हा थोडक्यांत सारांश. —लेखक ]

पंडित, प्राध्यापक व प्रशासक यांच्या अनेकविध सभासंमेलनांतून विश्वविद्यालयीन शिक्षणसमस्यांचा सतत ऊहापोह होत असतो; व कांहीं वेळां कायदेमंडळाचे सभासद व राजकीय नेते हेहि त्यांविषयीं चिंता करतांना आढळतात. तथापि हें व्यासपीठ कांहींसें निराळें आहे. विद्यापीठांचीं उद्दिष्टें, संघटना व कार्यप्रणाली यांचा विचार येथें प्रामुख्यानें कर्तव्य नाहीं. शिक्षणाच्या विविध अवस्थांचा एकमेकांशीं असलेला संबंध तपासून पाहणेंच येथें अधिक उचित होईल, अर्थात् तसें करतांना विद्यापीठांच्या स्वरूपाकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं हें उघड आहे. तथापि शिक्षणक्षेत्राच्या व्यापक पार्श्वभूमीवर विद्यापीठांचे प्रश्न विचारांत घेतल्यास त्यांचें आकलन अधिक यथार्थ व अर्थपूर्ण होऊं शकेल हें उघड आहे. तसेंच विविध अवस्थांचें परस्परावलंबित्वहि स्पष्ट होईल; व आपल्या अडचणींबद्दल इतरांना दोष देण्याच्या कांहीं वेळां आढळणाऱ्या प्रवृत्तीसहि आळा बसूं शकेल.

प्राथमिक, दुय्यम व उच्च ही शिक्षणक्षेत्रांतील अवस्थांची विभागणी निश्चित कप्पे सूचित करीत नाहीं; या अवस्थांमधील सीमारेषा स्पष्ट नाहींत ही एक सर्वमान्य बाब आहे. एका अर्थी मुलाच्या शिक्षणक्रमांतील कालानुक्रम दर्शविणाऱ्या या अवस्था होत असें म्हणतां येईल. मात्र एकींतून दुसरींत जातांना नवी परिस्थिती, नव्या संधी, नवनव्या जबाबदाऱ्या यांचा प्रत्यय त्याला येत असतो हें उघड आहे; व विद्यापीठांना तर हें विधान कितीतरी अधिक प्रमाणांत लागू पडणारें आहे. परंतु या अवस्थांचा पारस्परिक संबंध दिसतो त्यापेक्षां अधिक गुंतागुंतीचा आहे. विद्यार्थी प्राथमिक नंतर दुय्यम नंतर उच्च असा क्रमाक्रमानें पुढें जात असतो हें खरें. परंतु त्याबरोबरच सगळें शिक्षणकार्य याच्या उलट दिशेनें चाललेलें असतें हेंहि तितकेंच खरें आहे. कोणत्याहि अवस्थेची क्षमता ही तदनंतरच्या अवस्थेत काय होतें यावर बऱ्याच प्रमाणांत अवलंबून असतें इकडे दुर्लक्ष होतां कामा नये. प्राथमिक शिक्षणाचा दर्जा सुधारण्यासाठीं माध्यमिक अवस्थेचा वा माध्यमिकासाठीं विद्यापीठांचा विचार करणें आपोआपच आवश्यक बनतें.

### विकासश्रेणींतील गोंधळ

तसें पाहिल्यास हा मुद्दा अगदीं साधा व सरळ आहे. परंतु शिक्षणक्षेत्राच्या नियोजित विकासाचा प्रश्न हाताळतांना लावल्या जाणाऱ्या श्रेणींतील दोषामुळें त्याचा पुनरुच्चार करणें आवश्यक झालें आहे. एकूण योजनेचा खर्च व आर्थिक विकास आणि सामाजिक हितासाठीं खर्च यांत होणारी त्याची विभागणी याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. दुसऱ्या प्रकारच्या कार्यासाठीं व तदंतर्गत शिक्षण विकासासाठीं खर्च करायची रकम हीं दोन्हीहि येथें गृहीत धरून चाललें पाहिजे. तसेंच आर्थिक विकासाची गरज म्हणून विविध प्रकारचे आवश्यक तंत्रज्ञ शिकवून तयार करण्यासाठीं लागणारा खर्च हाहि तूर्त गृहीत धरावयास हरकत नाहीं. मात्र हें झाल्यानंतर उरलेल्या रकमेच्या खर्चाच्या बाबतींत विकासश्रेणी



अनुक्रमणिका






ठरविण्याचा प्रश्न फारसा उरत नाहीं. शिक्षणक्षेत्रांतील विविध अवस्थांचा विकासाच्या दृष्टीनें विचार करायचा झाल्यास त्यांत श्रेणी ठरविण्याची गरज नसून त्यांतील समतोलपणा कायम राखून सर्वच क्षेत्राचा, शैक्षणिक दर्जावर सतत लक्ष ठेऊन, विकास करणें आवश्यक ठरतें. विकासविषयक विचारांत ही कल्पना फारशी आढळत नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें.

### शिक्षणप्रसार

स्वातंत्र्य प्राप्तीनंतरच्या काळांतील आमच्या शैक्षणिक परिस्थितीचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणजे अत्यंत झपाट्यानें होत असलेला शिक्षणप्रसार हें होय. शिक्षणाच्या सर्वच अवस्थांत ही परिस्थिती आढळते. किंबहुना जगांत सगळीकडेच हें घडत आहे असें म्हणतां येईल. महत्त्वाचा मुद्दा इतकाच कीं विविध अवस्थांतील प्रसाराचें वा वाढीचें प्रमाण व स्वरूप आमच्याकडे योजनेंतील खर्चासंबंधीच्या धोरणांनीं व निर्णयांनीं निश्चित झालें आहे. म्हणून त्या संबंधीं अधिक काळजीपूर्वक विचार करणें आवश्यक ठरतें.

शिक्षण हें इष्ट म्हणून शिक्षणप्रसार हा इष्टच समजला पाहिजे. आपण केवळ नियोजन मंडळाकडून खर्चाची तरतूद होते किंवा सार्वत्रिक मतदानहक्कावर आधारलेल्या लोकशाहींत सांस्कृतिक दर्जा सुधारणें आवश्यक आहे किंवा सर्वांना वयाच्या १४ व्या वर्षापर्यंत सक्तीचें व मोफत शिक्षण देण्याची जबाबदारी राज्यघटनेनुसार सरकारनें स्वीकारली पाहिजे म्हणून शिक्षणप्रसाराचा कार्यक्रम आखलेला नाहीं. शिक्षणाचें इष्टत्व मान्य करण्याचे हे सारे परिणाम होत; कारणें नव्हत. शिक्षण हें सर्वांच्याच दृष्टीनें एक महत्त्वाचें मूल्य म्हणून आपण स्वीकारलें आहे. अर्थात् हें एकदां मान्य केलें म्हणजे शिक्षण सार्वत्रिक करण्याची गति मात्र उपलब्ध साधनसामुग्रीवर अवलंबून राहील हें उघड आहे. त्याबरोबरच विविध अवस्थांच्या वाढीसाठीं या साधनसामुग्रीची विभागणी करण्याच्या निर्णयांतूनहि नवे प्रश्न उपस्थित होऊं शकतात हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. म्हणून या विभागणीमुळें योग्य जुळवाजुळव होईल, गोंधळ व तज्जन्य असंतोष व वैफल्य हीं निर्माण होणार नाहींत याबद्दल कटाक्षानें दक्षता बाळगली पाहिजे.

आतां प्राथमिक शिक्षणाच्या प्रसाराचा विचार करतांना आम्ही तो सर्वस्वीं योग्य समजतो व शक्य तितक्या झपाट्यानें तो झाला पाहिजे असें म्हणतो. आणि दुय्यम शिक्षणाच्या प्रसाराबाबत देखील सर्वत्र बहुधा हाच दृष्टिकोण आढळून येतो. राज्यघटनेंतील मार्गदर्शक तत्त्वावर बोट ठेवून प्राथमिक शिक्षण शक्य तितक्या लवकर सार्वत्रिक करण्याचें धोरण नियोजनांत आखण्यांत आलें आहे. व दुय्यम शिक्षणाबाबतच्या धोरणाचें स्वरूपहि असेंच आहे. अशाप्रकारें शिक्षणाची तहान सतत व वेगानें वाढवल्यानंतर विद्यापीठांतहि सर्वांना प्रवेश मिळाला पाहिजे अशी मागणी पुढें आल्यास आश्चर्य नाहीं. परंतु इथें मात्र आमच्यांत मतभेद निर्माण होतात. कांहींचें म्हणणें असें कीं विद्यापीठांत सर्वांना खुला व मोकळेपणानें प्रवेश मिळाला पाहिजे. उलट इतर कांहींचें म्हणणें असें कीं शिक्षणाचा दर्जा कायम राखण्यास ठीं विद्यापीठांनीं प्रवेश मागणारांतून अत्यंत काळजीपूर्वक निवड केली पाहिजे. सर्वांना प्रवेश देणें हा साधनसामुग्रीचा सामाजिक अपव्यय होय. या दोन भूमिकांतील विरोध विकोपाला जाईल कीं काय अशी अनेकांना भीति वाटते.

जन्मजात उच्चनीचतेवर आधारलेल्या आमच्या समाजांतील बहुसंख्य लोकांना शेकडों वर्षे शिक्षणाची संधीच मिळाली नाहीं. यामुळें त्यांच्या ठिकाणीं तद्विषयक तीव्र इच्छा निर्माण होणें स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें विद्यापीठाची पदवी ही अजूनहि सामाजिक प्रतिष्ठा व आर्थिक सुस्थिती प्राप्त करून घेण्याचें

प्रमुख साधन आहे. यामुळें विद्यापीठांतील प्रवेशाबाबत अटी वा बंधनें लादण्याची कल्पना ही हितसंबंधाचें रक्षण करण्यासाठीं वा अल्पसंख्यांकांची मिरासदारी कायम राखण्यासाठीं निघालेली कल्पना वाटते. या योगानें विद्यापीठांविषयीं संशय घेतला जातो, व बुद्धीविषयीचा आदर घटतो. वाढती विद्यार्थीसंख्या हें एक लोकशाहीच्या प्रगतीचें लक्षण समजलें जातें व तिला विरोध करणारांवर प्रतिगामित्वाचा शिक्का बसतो. विद्यापीठांनीं आपल्या परीक्षांत विद्यार्थी उत्तीर्ण झाले पाहिजेत एवढें फार तर म्हणावें; व उत्तीर्ण होणारास पदवी द्यावी. पण अमक्या गुणांना प्रवेश मिळेल व तमक्यांना मिळणार नाहीं हें म्हणणें मुळींच समर्थनीय नाहीं. त्यायोगानें गुणांच्या पडद्याआड हितसंबंध दडूं शकतात. देशांत आढळणाऱ्या समतेच्या वातावरणाचा या भूमिकेलाच पाठिंबा मिळतांना दिसतो हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे.

अमर्याद वाढीचे व तज्जन्य दाटीचे ( ओव्हर–क्राउडिंग ) शैक्षणिक दुष्परिणाम दुसऱ्या बाजुकडून पुढें मांडले जातात व ते प्रसिद्ध आहेत. शिक्षणाच्या दर्जावर त्यायोगानें होणारा दुष्परिणाम येथें विशद करण्याची गरज नाहीं. दर्जाची ही कल्पना बरीच गुंतागुंतीची असून एकाद्या विशिष्ट घटकाच्या साहाय्यानें तिचा पूर्ण उकल होऊं शकणार नाहीं हें उघड आहे. परंतु विद्यार्थी निवड करून घेतले पाहिजेत असें म्हणणारांच्या तद्विषयक भीतींत तथ्य आहे हें नाकारतां येणार नाहीं. तथापि सतत वाढणारी विद्यार्थीसंख्या व त्यांच्या मागणीला असणारा सामाजिक व भावनात्मक पाठिंबा ध्यानांत घेतां विद्यापीठांना संख्यावाढीला आळा घालतां येईल अशी फारशी आशा नाहीं. जनमताच्या दबावापुढें त्यांना नमतें घ्यावें लागण्याचाच संभव अधिक आहेसें वाटतें, व त्यामुळें केवळ पदव्या देण्याचे ' कारखाने ' हेंच स्थान त्यांना प्राप्त होईल. आपल्या परंपरागत शिक्षणपद्धतीपासून विद्यापीठें दिवसेंदिवस अधिकाधिक दूर जात असलेलीं स्पष्ट दिसत आहेत. बाह्य पदवी, सकाळ संध्याकाळचीं कॉलेजें, दिवसाकाठीं दोन वा तीन फेऱ्या ( शिफ्ट्स् ) इत्यादि अशा प्रकारचीं उदाहरणें आतां सर्वसामान्य होऊं पहात आहेत.

### एक कृत्रिम वाद

मला नम्रपणें इतकेंच सुचवायचें आहे कीं हा वादच मुळीं अवास्तव व कृत्रिम स्वरूपाचा आहे. व हें जितकें लवकर ध्यानांत घेतलें जाईल तितकें चांगलें. तो कृत्रिम असण्याचें कारण म्हणजे त्यांतील दोन भूमिका या दोन भिन्न पातळीवरील भूमिका आहेत. विद्यापीठांत सर्वांना प्रवेश मिळाला पाहिजे ही भूमिका सामाजिक दृष्टिकोणांतून निघाली आहे. उलट त्यांच्यांत निवड केली पाहिजे हें म्हणणें शैक्षणिक पातळीवरील आहे. या दोन दृष्टिकोनांचा सांधा कोठेंच जुळतांना दिसत नाहीं. यामुळें त्यांच्यांत संवाद होऊं शकत नाहीं. या वादांत ही वा ती बाजू घेणें अगदीं अनावश्यक आहे. उलट एकाच वेळीं दोन्ही बाजूंचें समर्थन करणें शक्य आहे.

विद्यार्थ्यांची निवड करण्याचीं कारणें कांहींहि असोत; तीं तात्विक वा मूल्याधिष्ठित आहेत असें म्हणतां येत नाहीं. जगांतील एकाहि राष्ट्रांत सर्वांना प्रवेश देणें शक्य झालेलें नाहीं; संपन्न अमेरिका वा साम्यवादी रशिया हीं दोन्हीहि यास अपवाद नाहींत, हें खरें. पण यासंबंधीची जबाबदारी विद्यापीठांवर टाकतां येत नाहीं. विद्यापीठांतील शिक्षण ही अत्यंत मोठी खर्चाची बाब आहे; व सर्वांना त्यापासून फायदा मिळतोच असें नाहीं तथापि तरी देखील एखाद्यानें सर्वांना प्रवेश मिळाला पाहिजे असें म्हटल्यास त्याबाबत मूलभूत स्वरूपाचा वा तात्विक आक्षेप घेतां येणार नाहीं. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक असणें इष्ट व विश्वविद्यालयीन शिक्षण अनिष्ट असें










कां, यास तात्विक उत्तर दिसत नाहीं म्हणून सामाजिक दृष्टीनें विचार केल्यास प्रवेश हवा म्हणणाऱ्या सर्वांना विद्यापीठांत प्रवेश मिळणें योग्य होय हें मान्य करावें लागेल. तसेंच केवळ लोकसंख्येच्या एक टक्का लोकांना उच्च शिक्षणसंस्थांत आज प्रवेश मिळतो. यामुळें संख्येवर निर्बंध घालण्याची कल्पना तूर्त तरी स्वीकारली जाण्याचा सुतराम् संभव नाहीं. यामुळें व्यावहारिक भूमिकेवरून देखील ही कल्पना पुढें मांडण्यांत फारसें तथ्य नाहीं असें सकृद्दर्शनीं म्हणावें लागतें.

तथापि उच्च शिक्षणाचा प्रसार कितीहि इष्ट असला तरी तातडतोब वा नजीकच्या भविष्यकाळांत तरी तो अत्यंत मर्यादित प्रमाणांतच शक्य आहे असें म्हणावें लागतें. आणि नेमकी हीच गोष्ट शिक्षणतज्ज्ञांना सांगायची आहे. प्रसाराला त्यांचा विरोध नाहीं; संख्यावाढीला त्यांची हरकत नाहीं. पण त्यायोगें होत असलेली गर्दी ( over crowding ) मात्र त्यांना मान्य नाहीं. आणि या दोन गोष्टी अगदीं भिन्न होत. प्रसाराचा संबंध शिक्षणाशीं आहे; गर्दी ही उपलब्ध सवलती व साधनसामुग्री यांजवर अवलंबून आहे. सैद्धांतिक दृष्टिकोनांतून विचार केल्यास मुळींच गर्दी होऊं न देतां भरपूर प्रमाणांत शिक्षणप्रसार शक्य आहे; तसेंच थोड्याशा प्रसारांतहि भरपूर गर्दी होणें शक्य आहे. व या विधानांत प्रस्थापित हितसंबंधांचा विचार अभिप्रेत नसून शिक्षणाची योग्य कल्पना हीच अभिप्रेत आहे. प्रसाराचा पुरस्कार करतांना शिक्षणाच्या आवश्यक गरजांकडे दुर्लक्ष झाल्यास अनवस्था प्रसंग निर्माण होणें शक्य आहे. केवळ संख्यावाढ व त्यांची मागणी याकडेच लक्ष दिलें जाईल व शिक्षणाच्या पातळी वा दर्जाकडे दुर्लक्ष होईल. व शिक्षणप्रसाराची कल्पना मुळांतच अर्थशून्य होऊं लागेल. यापेक्षाहि अधिक मोठा धोका या दृष्टिकोनांतून उद्भवूं शकतो, व याचें कारण म्हणजे तो सामाजिक पातळीवरून राजकीय पातळीवर घसरण्याची शक्यता हें होय. असें झालें कीं बहुसंख्य जनतेच्या खऱ्याखुऱ्या हिताचा विचार मागें पडून त्यांना केवळ खूष करण्याची वा ठेवण्याची प्रवृत्ति बळावते. विद्यापीठांत सर्वांना प्रवेश मिळावा हें म्हणणें तत्त्व व नीति या दोन्ही भूमिकावरून समर्थनीय आहे. तें तसें न राहातां लोकांच्या भावना व त्यांच्याशीं जुळतें घेण्याची वृत्ति यांना महत्त्व प्राप्त होतें. यांतूनच विद्यापीठांवर झुंडींचा दबाव आणला जाण्याचा संभव निर्माण होतो. विद्यापीठांच्या भवितव्यांचा विचार करणारांनीं या बाबतींत जागरूक राहाणें आवश्यक आहे.

विद्यापीठांच्या सार्वत्रिकतेविषयीची मागणी राजकीय पातळीवर घसरण्याची शक्यता हें आजच्या परिस्थितींतील एक मोठें भयस्थान आहे. अर्थात् सार्वत्रिकतेच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें रास्त व न्याय्य आहे हें मान्य करावयास हवें तथापि याचा अर्थ गर्दी व तिचे शैक्षणिक परिणाम यांकडे दुर्लक्ष केलें पाहिजे असा होतां कामा नये.

## गर्दीचें व्यापक स्वरूप

गर्दीचा प्रश्न हा विद्यापीठांपुरता मर्यादित नाहीं हें प्रथम स्पष्ट केलें पाहिजे. उपलब्ध साधनसामुग्री वा सवलतींशीं गर्दीचा संबंध असल्यामुळें शिक्षणक्षेत्राच्या कोणत्याहि अवस्थेत गर्दीची परिस्थिति निर्माण होणें शक्य आहे. तिच्या योगानें जसा उच्च शिक्षणाचा दर्जा खालावतो तसाच दुय्यम वा प्राथमिक शिक्षणाचाहि. योग्य व कार्यक्षम शिक्षकांचा तुटवडा असल्यास एकेका शिक्षकाला दोनदोन तीनतीन वर्गांकडे लक्ष द्यावें लागल्यास वा एकेका वर्गांतील विद्यार्थीसंख्या चाळीसावरून साठ, साठवरून पाऊणशें अशी वाढूं लागल्यास त्याचा शिक्षणाच्या दर्जावर अनिष्ट परिणाम होणें स्वाभाविक आहे. आजच्या दुय्यम वा प्राथमिक शिक्षणक्षेत्रांत अशी परिस्थिति आढळत










नाहीं असें कोण म्हणेल. म्हणूनच शिक्षणाच्या विविध अवस्थांच्या प्रसाराचा कार्यक्रम एकूण साधनसामुग्री विचारांत घेऊन व त्यांच्यांतील समतोलपणा कायम राखून आखला गेला पाहिजे. केवळ प्राथमिक वा दुय्यम अवस्थांवर भर दिल्यानें विद्यापीठांत येऊं इच्छिणारांची संख्या उपलब्ध सवलतींच्या मानानें कितीतरी वाढते; व उच्च शिक्षणाची पातळी खालावण्याची शक्यता बळावते, इतकेंच. यापेक्षां निराळें यांतून कांहींहि साध्य होत नाहीं; असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## सामाजिक दृष्टिकोनहि व्यापक हवा

विद्यापीठांनीं सर्वांना प्रवेश दिला पाहिजे असा आग्रह धरतांना व्यापक सामाजिक हिताचा विचार केला पाहिजे. आपणांजवळ साधनें पुरेशीं नाहींत हें खरें. परंतु यावरून उपलब्ध साधनें प्रथम प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्यासाठीं खर्च केलीं पाहिजेत असें मात्र म्हणतां येत नाहीं. व्यापक सामाजिक हिताच्या दृष्टीनें योग्य दर्जाचें उच्च शिक्षण हेंहि तितकेंच महत्त्वाचें आहे. साक्षरता वा काहीएक प्रमाणांत शालेय शिक्षण सर्वांना मिळणें ही लोकशाहीची एक महत्त्वाची गरज आहे; त्याचप्रमाणें जीवनाच्या विविध क्षेत्रांत समाजाला योग्य नेतृत्व लाभणें हेंहि तितकेंच महत्वाचें आहे. हें नेतृत्व बहुधा उच्च शिक्षणांतूनच तयार होत असतें. विद्यापीठांतील शिक्षणाची पातळी खालावणें म्हणजे कालांतरानें सर्वच शिक्षणाची पातळी खालावण्यासारखें आहे; व सर्वच समाजाची त्यांत हानी आहे. म्हणून अधिकाधिक संख्येनें परंतु योग्य दर्जाचें शिक्षण देऊन तरुण-पिढी तयार करण्यासाठीं विद्यापीठांना साहाय्य मिळणें आवश्यक आहे. यांत टप्या टप्यानें पण सतत होत जाणारी संख्यावाढ गृहीत धरली असल्यामुळें उच्च शिक्षण विशिष्ट वर्ग वा गट यांच्यापुरतेंच मर्यादित राहाण्याचा प्रश्न उद्‌भवत नाहीं उलट सर्व समाजाचा विचार केल्यावांचून विशिष्ट गुणवत्तेच्या विद्यार्थ्यांची पुरेशी संख्या विद्यापीठांना मिळूंच शकणार नाहीं. यामुळें विशिष्ट जमातीचें वा वर्गाचें वर्चस्व प्रस्थापित होण्याचा संभव नाहीं. उलट योग्य व कार्यक्षम स्वरूपाचा लोकशाहीचा पाया हळु हळु घातला जाणेंच या योगानें शक्य होईलसें वाटतें.

अशा प्रकारें विद्यापीठांत ज्यांना प्रवेश मिळणें आवश्यक आहे पण दारिद्र्यामुळें ज्यांना तो मिळूं शकत नाहीं अशा विद्यार्थ्यांकडे मात्र खास लक्ष पुरविण्याची गरज यांत राहीलच. उच्च शिक्षण ही खर्चाची बाब असल्यानें अशीं बरींच उदाहरणें सांपडण्याचा संभव आहे. त्यांना दारिद्र्याची अडचण येऊं नये म्हणून आर्थिक साहाय्य देणें उचित होईल. अर्थात् विद्यार्थ्यांची लायकी ही परीक्षेंतील मार्कांवरून ठरविणें कितपत इष्ट होईल हा प्रश्न येथें शिल्लक राहातोच. आजच्या परीक्षापद्धतींतील सर्व दोष मान्य करूनहि आजतरी त्यावांचून दुसरा निर्दोष मार्ग आपणांजवळ नाहीं हें मान्य करावें लागेल. अर्थात् कालांतरानें या दिशेनेंहि सुधारणा करणें शक्य आहे.

## विद्यापीठांचें स्वरूप व स्थान

आमच्या जीवनांतील अन्य क्षेत्रांप्रमाणेंच विद्यापीठांतहि झपाट्यानें बदल होत आहे. आजच्या बदलत्या परिस्थितींत विद्यापीठांबद्दल निरनिराळ्या अपेक्षा बाळगल्या जात आहेत; त्यांच्याकडे मागण्या होत आहेत. ऐतिहासिक परिस्थितींतून उद्भवलेलें त्यांच्या पदव्यांचें महत्त्व अजून कायम आहे व त्याबरोबरच त्यांच्याविषयींचा अनादर व अनास्थाहि ! " हस्तिदंती मनोऱ्यांची कल्पना आतां नाहींशीच झाली आहे. माझ्या अल्प समजुतीनें ही अभिमानाची गोष्ट नसून खेदाची बाब आहे. जीवनाचें अधिष्ठान बदलत असतांना, नवे आधार अजून मिळायचे आहेत अशा परिस्थितींत केवळ प्रवाह-










पतित व्हावयाचें नसल्यास " हस्तिदंती मनोऱ्यां-चीहि गरज आहे. बदलाच्या या झंझावातांत सर्वस्वीं उडून जाऊं नये यासाठीं आधार म्हणून विद्या-पीठांकडेच पाहिलें पाहिजे. आमच्यासारख्या सतत बदलत चाललेल्या समाजांत विद्यापीठांचें कार्य दुहेरी स्वरूपाचें आहे; ते दीपस्तंभ होत व त्याबरोबरच " लाइफ-बॉय " देखील. समाजांतील नैमित्तिक वादळांपासून दूर, अलिप्त, थंड राहून हवा असेल त्याला प्रकाश देण्याचें, मार्ग दाखवण्याचें सामर्थ्य त्यांच्याठिकाणीं असलें पाहिजे. परंतु त्याबरोबरच त्यांना सर्वस्वी अलिप्त राहाणें शक्य नसल्यानें सभोंवतालच्या राजकीय, वा भावनात्मक दबावांच्या लाटांनीं इतस्ततः फेकलें न जातां वा गिळंकृत न होतां डोकें वर ठेवण्याची हिंमतहि तेथें दिसली पाहिजे. अलिप्ततेनें मार्गदर्शन व कणखरपणानें आत्मरक्षण करण्यास त्यांनीं उद्युक्त झालें पाहिजे. असें झाल्यावांचून शंभर वर्षांहून अधिक काळ पर्यंत मिळालेल्या उदार शिक्षणाचें चीज झालेसें म्हणतां येणार नाहीं. विद्येमुळें स्वतंत्र करणाचें सामर्थ्य त्यांना प्राप्त होणें हीच आमची खरी गरज आहे.

---










श्री. अद्वयानंद गळतगे

# विश्वाच्या उत्पत्तीविषयींचे दोन आधुनिक सिद्धांत : १ :

भौतिक विश्वाचें गुंतागुंतीचें स्वरूप समजावून घेण्याचें, म्हणजेच तें स्वरूप अधिक सोपें करण्याचें विज्ञानाचें ध्येय असल्याकारणानें विश्वाचा जास्तीत जास्त भाग कमीत कमी नियमाखाली आणण्याचा त्याचा सतत प्रयत्न चाललेला असतो. याचें अलीकडचें उदाहरण म्हणजे आईन्स्टाईन यांचा सापेक्षता सिद्धांत होय. न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाच्या आधार ज्या गोष्टींची उपपत्ति लागत नव्हती त्यांची सापेक्षता सिद्धांताच्या साहाय्यानें लागली असल्याकारणानें न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणापेक्षाहि सापेक्षता सिद्धांत अधिक व्यापक ठरला आहे. स्वाभाविकपणेंच विश्वाचा विचार करतांना सापेक्षता सिद्धांताला अग्रस्थान द्यावें लागतें. कारण विश्वाचा जास्तीत जास्त भाग त्या सिद्धांताने नियमाखाली आणला आहे. असें असलें तरी तो सिद्धांत अजून बराच अपुरा आहे. तो पूर्ण करण्याचा अलीकडे प्रयत्न झालेला असला तरी त्याला म्हणावें तसें यश आलेलें नाहीं.

सापेक्षता सिद्धांत अधिक व्यापक करण्याचा अलीकडे एका निराळ्याच दृष्टीने प्रयत्न झालेला आहे. ज्योतिर्विज्ञानांत झालेल्या अलीकडच्या प्रगतीमुळें विश्वाच्या यंत्रव्यवस्थे- ( Cosmology ) विषयी सापेक्षता सिद्धांत कित्येक शास्त्रज्ञाना बराच तोकडा वाटतो. दृश्य विश्वाचें क्षेत्र जसजसें वाढत जातें तसतशी अधिक मूलग्राहि व सर्वव्यापक सिद्धांताची गरज भासूं लागते. ही गरज लक्षांत घेऊन कांहीं शास्त्रज्ञानीं अलीकडे विश्वाविषयी दोन नवीन सिद्धांत मांडले असून ( या सिद्धांताना अजून गणिताचें काटेकोर स्वरूप देण्याचा पूर्ण प्रयत्न झालेला नाहीं. ) त्यांच्या प्रयत्नामुळें विश्वाच्या यंत्रणेविषयींच्या बऱ्याच भागावर प्रकाश पडण्याची आशा निर्माण झाली आहे. या शास्त्रज्ञांच्या प्रयत्नांचा इत्यर्थ असा कीं **विश्वाच्या उत्पत्तीचें कोडें हाताळणें शक्य आहे.**

### एक संभाव्य आक्षेप

येथें एका संभाव्य आक्षेपाचा प्रथमच परामर्श घेणें उचित होईल. हा आक्षेप म्हणजे विश्वाच्या उत्पत्तीचें कोडें हाताळणें हें विज्ञानाचें सर्वांत मोठें धाडस — सर्वात मोठा अविचार नव्हे काय ?

याला उत्तर असें कीं विज्ञान हेंच एक मोठें धाडस आहे. विज्ञानाचा इतिहास हा मानवाच्या धाडसाचाच इतिहास म्हणतां येईल. आणि अविचाराविषयीं बोलायचें झाल्यास अविचार कोणता व विचार कोणता हें केवळ तर्कानें ठरवितां येत नसल्याकारणाने कधीकधी 'अविचार' सुद्धां करणें विज्ञानाला भाग पडतें. ऑगस्टी कॉम्टे या तत्वज्ञाने १९ व्या शतकाच्या मध्यास असें स्पष्टपणें जाहीर केलें होतें कीं विज्ञानाला ताऱ्यांची घटना कधीच कळणार नाहीं. पण हल्ली शास्त्रज्ञ ताऱ्यांतील मूलद्रव्यांची टक्केवारीनें माहिती देतात. इतकेंच नव्हे तर हैड्रोजन बॉंबच्या रूपानें त्यानीं एक छोटा ताराच पृथ्वीवर निर्माण केला आहे. पण असा आक्षेप अपेक्षितच आहे. कारण विज्ञानाने जेव्हां जेव्हां पुढें झेप घेतली आहे, तेव्हां तेव्हां लोकानीं ती झेप अविचारी समजून तिला विरोधच केला आहे. आणि हें लोकांच्या विज्ञानविमुख वृत्तीला धरूनच आहे. समाधान एवढेंच कीं असे नवीन सिद्धांत मांडल्याबद्दल आधुनिक शास्त्रज्ञांचा गॅलीलियो आणि ब्रूनो यांचा तत्कालीन लोकांनी केला त्याप्रमाणें कोणी छळ करीत नाहीं !

### विश्वाच्या उत्पत्तीविषयी दोन परस्परविरुद्ध सिद्धांत

वर उल्लेख केलेल्या शास्त्रज्ञांचे दोन सिद्धांत परस्परविरुद्ध आहेत ही गोष्ट प्रथमच नमूद केली पाहिजे. ही प्रथमदर्शनी वाटते तशी तोट्याची गोष्ट नसून फायद्याचीच आहे कारण दोन सिद्धांतामध्ये थोडाच फरक असता तर त्यांची निरीक्षणात्मक तपासणी करणें कठीण



अनुक्रमणिका







झालें असतें. आईन्स्टाईनांच्या सापेक्षता सिद्धांताला शास्त्रीय जगामध्यें मान्यता मिळण्यास कित्येक वर्षें लागलीं याचें कारण न्यूटनच्या गुरुत्वाकर्षण नियमाच्या समीकरणांतील आणि आईन्स्टाईनांच्या गुरुत्वाकर्षण-नियमाच्या समीकरणांतील तफावत फारच थोडी होती हेंच होय. ही तफावत कोणत्याहि वस्तूच्या वेगाच्या व प्रकाशाच्या वेगाच्या प्रमाणाच्या वर्गावर अवलंबून आहे. सर्वात वेगवान् ग्रह (बुध) घेतला तरी दोन्ही सिद्धांतामधील ही तफावत फक्त ०·०००००००२३ इतकी होते. इतका सूक्ष्म फरक हुडकणें अत्यंत जिकी-रीचें काम आहे. पण सुदैवाने प्रस्तुत सिद्धांत परस्पर-विरुद्ध असल्याकारणानें त्यांच्या खरेखोटेपणाच्या कसो-टीसाठीं पुरावा हुडकण्याचें काम सोपें झालें आहे. हें या दोन्ही सिद्धांतांचें एक आशाजनक स्वरुप म्हणतां येइल.

## निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञान

या सिद्धांतांचा विचार करण्यापूर्वी ज्योतिर्विज्ञानांत अलीकडे झालेल्या प्रगतीचा थोडक्यांत आढावा घेणें फायद्याचें ठरेल, असें वाटतें.

कित्येक वर्षापासून दुर्बिणींतून अंधुक दिसणाऱ्या काहीं विशिष्ट आकाराच्या वस्तूंबद्दल शास्त्रज्ञामध्यें बराच मतभेद निर्माण झाला होता. या वस्तु धुरकट प्रकाशमान असून त्या लंबवर्तुळाकृति दिसत होत्या. म्हणून त्यांना तेजोमेघ ( nebulae ) असें त्या काळीं नांव देण्यांत आलें. त्या काळच्या बहुसंख्य शास्त्रज्ञांच्या मतें हे तेजोमेघ म्हणजे आपल्या तारकाविश्वांतील (आकाशगंगेतील) ढग होते. एकादा तारा स्वतः-भोवतीं प्रचंड वेगाने फिरूं लागला तर अशी आकृति निर्माण होणें शक्य आहे, असें काहींचें मत होतें. पण जर्मन शास्त्रज्ञ कांट यांचें मत निराळेंच होतें. त्याच्या मतें हे तेजोमेघ म्हणजे आपल्या तारकाविश्वापासून अत्यंत दूर असलेलीं स्वतंत्र तारकाविश्वेंच होत. तीं इतकीं दूर आहेत कीं त्यांतील तारे मोठ्या दुर्बिणींतूनसुद्धां आपणाला दिसत नाहींत. म्हणून त्यांना ( नंतर हबलनीं सुचविल्या-प्रमाणें ) द्वीपविश्वें ( Island universes ) म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. ही अनिर्णीत अवस्था विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकापर्यंत होती.

दुसऱ्या दशकाच्या शेवटीं, म्हणजे पहिल्या महा-युद्धानंतर अमेरिकेन विल्सन पर्वतावर १०० इंच व्यासाची दुर्बिण उपयोगांत आणली गेली. या दुर्बिणीनें शेवटीं या प्रश्नाचा निकाल लावला. तिने हे तेजोमेघ म्हणजे स्वतंत्र तारकाविश्वेंच होत या कांटच्या सिद्धां-तालाच बळकटी आणली; आणि विश्वाची क्षेत्रमर्यादा कल्पनेपेक्षाहि जास्त पसरली. पृथ्वी विश्वाच्या केंद्र-भागीं आहे असें एकेकाळीं मनुष्य समजत होता. आत्मकेंद्री वृत्तीच्या या मानवाची कशी पीछेहाट होत गेली हें पाहणें फार मनोरंजक आहे. निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञान म्हणजे मानवाच्या या आत्मकेंद्री वृत्तीच्या पद्धतशीर पराभवाची कहाणीच होय असें म्हटलें तरी चालेल. या संदर्भात आकाशगंगा ही असंख्य ताऱ्यांची बनली आहे असा गॅलीलियोने शोध लावल्यानंतर हर्शलने सूर्य आकाशगंगेच्या केंद्रभागीं आहे असें मत प्रतिपादिलें होतें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे ! ( सूर्य आकाशगंगेच्या केंद्रापासून ३० हजार प्रकाशवर्षे अंतरावर आहे. )

हे तेजोमेघ आकाशांत सर्व दिशाना सारख्याच प्रमाणांत विखुरले आहेत. आपल्या आकाशगंगेला सर्वात जवळचा तेजोमेघ म्हणजे मॅगेलनचा मेघ होय. ही एक जोडी असून त्यांचें आपल्यापासूनचें अंतर १५०००० प्रकाशवर्षे आहे. ( १ प्रकाश वर्ष म्हणजे सुमारें ६०००,०००,०००,००० मैल. ) आपणाला जवळ असलेला सर्वांत भव्य तेजोमेघ म्हणजे देवयानी तारका पुंजातील ' मीसीयर ३१ ' होय. त्याचें आपल्यापासू-नचें अंतर १५००००० प्रकाश वर्षे आहे. हा तेजोमेघ एकेकाळी आपल्या आकाशगंगेतील ढग समजला जात होता. पण हबलनी विल्सन पर्वतावरील १०० इंची व्यासाच्या दुर्बिणीच्या सहायाने १९२४ सालीं यांतील तारे निराळे करून दाखविले, आणि तें एक स्वतंत्र तारकाविश्व असल्याचें सिद्ध केलें.

आपल्या आकाशगंगेच्या जवळपास कित्येक तेजो-मेघ असून त्यांचा एक समूह बनलेला आहे. या समू-हाला ' स्थानिक गट ' ( Local Group ) असें नांव देण्यांत आलें आहे. या गटांत सुमारें १९ तेजो-मेघ आहेत. असे इतर अनेक गट विश्वांत विखुरलेले आपणाला पाहायला मिळतात. आपल्या स्थानिक

गटाला सर्वांत जवळचा दुसरा तेजोमेघांचा गट कन्या राशीत आढळतो. त्याचें आपल्यापासूनचें अंतर ३०००००० प्रकाश वर्षें आहे.

विश्वांत या तेजोमेघांचो पसरण गटागटानी झाली असली तरी हे तेजोमेघ चोहोकडे सारख्याच प्रमाणांत विखुरले आहेत. शिवाय दुर्बिणीचें सामर्थ्य जसजसें वाढवावें तसतशी या तेजोमेघांची संख्या वाढतच जाते. अलीकडे ( १९४७ ) उपयोगांत आणलेल्या पॅलोमार-वरील २०० इंच व्यासाच्या दुर्बिणींतून पाहिलें तरी हे तेजोमेघ दृष्टीच्या टप्प्यापर्यंत पसरलेलेच दिसतात. त्याना मर्यादा असेल असें कांहीं वाटत नाहीं.

हे तेजोमेघ विश्वांत गटागटानें विखुरले आहेत हा एक आधुनिक ज्योतिर्विज्ञानाचा महत्वाचा शोध आहे. तारकांचे जसे गट बनले आहेत तसेच तेजोमेघांचेहि गट बनले आहेत ही विश्वाची यंत्रणा समजावून घेण्याच्या दृष्टीनें महत्वपूर्ण गोष्ट आहे; ही वस्तुस्थिति असें सूचित करते कीं तेजोमेघ आणि तारे यांच्या निर्मितीची यंत्रणा बहुतेक सारखीच आहे.

या तेजोमेघाविषयी आढळून आलेली एक वैशिष्ट्य-पूर्ण गोष्ट म्हणजे ते ताऱ्याप्रमाणेंच स्वतःभोवतीं फिरत आहेत. हें सिद्ध करणें फार सोपें आहे. एकादी आग-गाडी आपल्या दिशेनें वेगानें येत असल्यास तिच्या शिटीचा आवाज प्रथम क्रमानें वाढत जातो, व ती आपणाला ओलांडून निघून जाताच त्याच क्रमानें कमी होत जातो, ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. हा आवाजातला कमीजास्तपणा वेगावर अवलंबून असून तो मोजतां आला तर आपणाला गाडीचा वेग काढतां येतो प्रकाशाचें वर्तन याबाबतींत ध्वनीप्रमाणेंच असल्यानें हा नियम प्रकाशालाहि लागू होतो. ( फरक इतकाच कीं ध्वनीलहरींतील फरक ध्वनीच्या तीव्रते-वरून ओळखावा लागतो, उलट प्रकाशलहरींतील फरक रंगावरून ओळखावा लागतो. ) तेजोमेघ स्वतःभोवतीं फिरत असतील तर तेजोमेघाची एक बाजू आपणाकडे येत असताना दुसरी बाजू आपणापासून दूर जाईल. वरील नियमाप्रमाणें दूर जाणारी बाजू अधिक तांबडी ( किंवा जवळ येणारी बाजू अधिक निळी ) दिसेल. याला Red Shift म्हणतात. या पद्धतीनें लंबवर्तुळा-कार ( Elliptical ) व नागमोडे ( Spiral ) तेजोमेघ स्वतःभोवतीं प्रचंड वेगानें फिरत आहेत हें सिद्ध झालें आहे. आपली आकाशगंगासुद्धां स्वतः-भोवतीं फिरत असून ती ३००,०००,००० वर्षांत एक प्रदक्षिणा पूर्ण करते.

## प्रसरण पावणारें विश्व

१९२९ सालीं एडविन हबल आणि ह्युमॅसन यांनीं एक महत्वाचा शोध लावला. त्यांना असें आढळून कीं हे तेजोमेघ आपणापासून दूर पळत आहेत ! ( हें वरील ' रेड शिफ्ट'च्या तंत्रानें ठरवितां येतें. ) शिवाय त्यांचा आपणापासून पळण्याचा वेग त्यांच्या अंतरावर अवलंबून आहे म्हणजे ते जितके अधिक दूर असतील तितक्या अधिक वेगाने ते आपणापासून दूर जात आहेत. त्यांचा वेग साधारणपणें दर १०००,००० प्रकाशवर्षे अंतराला सेकंदाला २० मैलानीं वाढतो.* सर्वांत दूर अंतरावरील तेजोमेघांचा वेग फारच मोठा असणार हें यावरून उघड आहे. आतापर्यंत मोज-लेल्या सर्वांत दूर अंतरावरील तेजोमेघांचा वेग सेकंदाला ४०,००० मैल असल्याचा आढळून आला असून त्यांचें आपल्यापासूनचें अंतर २ अब्ज प्रकाश वर्षें आहे. त्याच्या पेक्षां दूर अंतरावरील, पण हल्ली आप-ल्या आवाक्याबाहेरील, तेजोमेघांचा वेग प्रकाशाच्या वेगाच्या पुष्कळच जवळपास असला पाहिजे; आणि त्याच्याहि पलीकडील तेजोमेघांचा वेग बरोबर प्रका-शाच्या वेगाइतका असला पाहिजे हें उघड आहे. त्याच्या पलीकडचें विश्व अर्थात् आपल्या आवाक्या-बाहेरचें आहे. कारण ते मेघ प्रकाशापेक्षाहि जास्त

* हबलनी हा आकडा १०८ धरला होता. पण हा वेग अतिरिक्त असल्याचा आढळून आला आहे. अगदी अलीकडे ( १९६० ) सांडेज यानी अंतर काढण्याच्या प्रमाणामध्यें सुधारणा घडवून आणली असून हा बराच खाली आला आहे. येथें दिलेला आकडा एफ्. जी. स्मिथ यांचा आहे, दूरच्या तेजोमेघांचीं अंतर आणि ज्योतिर्विज्ञानांतील इतर महत्त्वाच्या गोष्टी या वेगावर अवलंबून असून या व पुढील लेखांतील तत्संबंधीचे निष्कर्ष स्मिथ यांच्या वरील आकड्यावरून ठरविले आहेत. स्मिथ यांचा आकडा सांडेज यांच्या आकड्याहून किंचित् जास्त आहे हें येथें लक्षांत ठेवावें.



अनुक्रमणिका








वेगाने धावत आहेत. आणि त्यामुळें त्यांचा प्रकाश आपणाला पोचतच नाहीं. हीच आपल्या दृश्य विश्वाची मर्यादा होय. ही मर्यादा कितीहि प्रचंड दुर्बिणींच्या रचनेने ओलांडतां येत नाहीं. या दृश्य विश्वाची मर्यादा १० अब्ज प्रकाश वर्षे अंतरावर संपते असें गणिताने ठरवितां येतें.

मागे आपण पाहिल्याप्रमाणें विश्वाचा विचार करतांना सर्वात जास्त व्यापक असा जो सापेक्षता सिद्धांत त्यालाच प्रथमस्थान दिलें पाहिजे. आतां निरीक्षणाने आढळून आलेल्या वरील ज्योतिर्विज्ञानातील पुराव्याना हा सिद्धांत कितपत जुळतो हें ठरविलें पाहिजे, हें ठरविण्यासाठीं आपणाला एक उदाहरण घेतां येईल. एक रंगित ठिपके असलेला रबरी फुगा एकसारखा फुगत आहे असें समजूं. हे रंगीत ठिपके जिवंत आहेत अशी कल्पना केली तर फुगा जसजसा फुगत जाईल तसतसें प्रत्येक ठिपक्याला वाटेल कीं दुसरे ठिपके आपणापासून एकसारखे दूर जात आहेत. आतां प्रत्येक ठिपक्यापुढें असा प्रश्न आहे कीं इतर ठिपके आपणापासून असे दूर कां पळत आहेत ? हे ठिपके लांबी व रुंदी या दोनच परिमाणा- ( dimension ) नी युक्त असल्याकारणाने त्यांना याचें उत्तर शोधण्यासाठीं कोणता तरी सिद्धांत मांडला पाहिजे हें उघड आहे.

या ठिपक्यांना आपला सिद्धांत मांडतांना पुढील प्रश्नांचीं उत्तरें शोधावीं लागतील, इतर ठिपके आपणापासून दूर कां पळत आहेत ? ते विशिष्ट वेगानेंच कां पळत आहेत ? ते असे केव्हांपासून पळत आहेत व कुठपर्यंत पळत राहतील ? ज्या ठिपक्यांना आपण फुग्यावर आहोत याची कल्पना नसल्या-कारणाने त्यांचे सिद्धांत अनेक प्रकारचे असतील, आतां प्रश्न असा आहे कीं या अनेक प्रकारच्या सिद्धांतांपैकी कोणता सिद्धान्त खरा मानायचा ?

आपल्या विश्वाविषयी नेमकी हीच परिस्थिति आहे. या ठिपक्यांच्या जागीं तेजोमेघांची कल्पना केली तर त्यांच्या पळण्याची कारणमीमांसा करतांना अनेक सिद्धांत मांडले जाण्याची शक्यता आहे. किंबहुना सापेक्षता सिद्धांताला जुळणारे अनंत सिद्धांत शक्य आहेत असें दाखवून देतां येईल. आणि हीच खरी अडचण आहे. कारण या अनंत सिद्धांतापैकी आपणाला फक्त एक सिद्धांत निवडायचा आहे, कारण एकच सिद्धांत खरा आहे.

या अडचणींतून एक पळवाट आहे, ती अशी कीं विश्वांतील तेजोमेघांच्या संख्येला, म्हणजेच विश्वांतील वस्तूला एक निश्चित मर्यादा आहे असें कल्पून तिची तर्काने किंमत ठरवायची. त्याच पद्धतीने तिची अवकाशांतील सरासरी सांद्रता ( Average density ) ठरवायची. अशा पद्धतीने जे निष्कर्ष निघतील ते खरें असतील अगर नसतील. पण विश्वाविषयी एक उपयुक्त व समजण्याजोगी कल्पना त्यामुळें तयार होईल. ही पद्धति आईन्स्टाईन आणि एडिंग्टन यानीं स्वीकारली आहे.

आतां कोणी म्हणेल, विश्व हें रबरी फुग्यासारखें फुगत आहे अशी कल्पना केली तर ही अडचण आपोआप नाहींशी होते. कारण त्यामुळें तेजोमेघांच्या दूर पळण्याचें कोडें उकलतें. पण हीच खरी अडचण आहे. विश्व हें रबरी फुग्याप्रमाणें आहे असें समजण्यास कांहींच पुरावा नाहीं. ( आणि तें रबरी फुग्याप्रमाणें आहे असें समजलें तर तें तसें कां फुगावें हा प्रश्न आहेच. ) आईन्स्टाईन व एडिंग्टन यानीं त्याची तशी कल्पना केली ती विश्वांतील वस्तूची एक निश्चित मर्यादा ठरविल्यामुळें होय. अवकाशात वस्तु एका ठराविक प्रमाणांत पसरली आहे अशी कल्पना केली तर सापेक्षता सिद्धांतान्वये अवकाशाला वक्रता येईल; व ती वक्रता विरुद्ध बिंदूला जाऊन मिळेल. परिणामी विश्व हे सांत ( finite ) ठरेल. विश्वाच्या या कल्पनेनुसार ( फ्रीडमन आणि लमैत्र यानीं दाखवून दिल्याप्रमाणें ) विश्व अस्थिर बनेल व थोड्याशाहि धक्क्यांने प्रसरण ( अगर आकुंचन ) पावूं लागेल. आतां हा ' थोडासा धक्का ' कोणी व कां दिला हा प्रश्न आहे. तो केवळ ' आकस्मिक ' आहे असें समजलें तरी तो धक्का प्रसरण पावण्याच्या दिशेनेच कां दिला गेला, आकुंचन पावण्याच्या दिशेने कां दिला गेला नाहीं, हा प्रश्न आहे. हेंहि आकस्मिक समजलें तर विश्वाच्या इतर अनेक गोष्टी निरीक्षणाने आढळलेल्या प्रमाणांतच कां आहेत हें त्यावरून स्पष्ट होत नाहीं. ( उदा. विश्वांतील हैड्रोजनचें बाहुल्य ). त्याहि गोष्टी आकस्मिक आहेत असें समजलें तर विज्ञानाचा







आधार बराच दुर्बल होतो. कारण वरवर दिसणारी आकस्मिकता नियमाखाली आणणे हा विज्ञानाचा मुख्य हेतु आहे. या सर्वाचा अर्थ असा कीं निरीक्षणा-पासून या सिद्धांतानें बरोबर निष्कर्ष काढलेले नाहींत.

या निष्कर्षांखेरीज इतर निष्कर्ष काढतांच येत नसतील तर अर्थात् तो प्रश्न मानवाच्या आवाक्या-बाहेरचा ठरतो. निरीक्षणानें आढळलेल्या गोष्टींची जर सुसंगत उपपत्ति आपणाला लावतां येत नसेल तर विश्वाचें कोडें हें न सुटणारें कोडें मानावें लागतें. मग विश्वाच्या उत्पत्तीचा सिद्धांत हा विज्ञानाचा विषय होऊं शकत नाहीं असें मानलें पाहिजे. अलीकडील सिद्धांतांचा मथितार्थ असा कीं असें मानण्याची मुळींच गरज नाहीं. निरीक्षण आणि सिद्धांत या दोन्ही साधनानी या प्रश्नावर हल्ला चढविणें शक्य आहे.

या नवीन सिद्धांतांचा निष्कर्ष असा कीं विश्व हे अनंत आहे तसेंच विश्वांतील वस्तुहि अनंत आहे. विश्वाची उत्पत्ति ही शास्त्रीय दृष्ट्या सुसंगत कल्पना असून ती निश्चित स्वरूपाची आहे. या नवीन सिद्धां-ताचा आतां विचार करूं.

हे नवीन सिद्धांत दोन प्रकारचे आहेत. पहिल्या प्रकाराला 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत ( Evolutionary Theory ) असें नांव देण्यांत आलें आहे. या प्रकारचा सिद्धांत बहुसंख्य शास्त्रज्ञाना मान्य असल्याचा दिसतो. पण अगदी अलीकडे याला विरोधी असा एक नवीन सिद्धांत कांहीं ब्रिटिश शास्त्रज्ञानीं मांडला असून तो पुष्कळांना आकर्षक वाटला आहे. पण तो अजूनहि 'प्रायोगिक' अवस्थेंत आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. म्हणून पहिल्या प्रकारच्या सिद्धांताचा प्रथम विचार करावयाचें ठरविलें असून दुसऱ्या प्रकारच्या सिद्धांताचा विचार एका स्वतंत्र लेखांत करण्याचें ठरविलें आहे.

## 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत

या प्रकारचा सिद्धांत पहिल्यांदा बेल्जीयन शास्त्रज्ञ लमैत्र यानीं मांडला. पण त्यानी त्याला गणितानें मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न केला नाहीं. ती कामगिरी मेयर व एडवर्ड टेलर ( 'हैड्रोजन बाँबचा जनक' ) यांच्या-वर पडली. त्यांचेंहि काम बरेंच सदोष असल्याचें आढळून आल्यामुळें अलीकडे अल्फर, हर्मन, आणि गॅमो यानीं तें पूर्ततेस नेलें आहे. गॅमोनी आपल्या सिद्धांताला 'आयलम' ( Ylem ) चा सिद्धांत असें नांव दिलें असून त्याचाच येथे विचार करण्याचें ठरविलें आहे.

निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानाला आढळलेली विश्वा-च्या प्रसरणाची वस्तुस्थिति या सिद्धांताचा मूलाधार होय. विश्व एका ठराविक वेगानें प्रसरण पावत आहे ही गोष्ट निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानानें सिद्ध केली आहे. अशाप्रकारें विश्व जर प्रसरण पावत असेल तर तें कां प्रसरण पावत आहे. हें अगोदर माहीत झालें पाहिजे. पण हें माहींत नसतानासुद्धां विश्वाविषयीची एक महत्त्वाची माहिती आपणाला मिळवितां येईल. ती म्हणजे हें विश्व केव्हापासून असें प्रसरण पावत आहे याविषयीची होय. विश्वाच्या प्रसरणाचा काल ठरविणें फार सोपें आहे. आपणापासून दूर पळणारे तेजोमेघ एका विशिष्ट वेगानें पळत आहेत. तो वेग त्यांच्या आपल्यापासूनच्या अंतरावर अवलंबून आहे. म्हणजे ते आपणापासून जितके अधिक दूर आहेत तितक्या अधिक वेगानें पळत आहेत. या दोन्हींतील, म्हणजे अंतरांतील व वेगांतील ही 'अधिकता' कधीच बदलत नाहीं. ती वेगाला अंतरानें भागल्यानें मिळते. हाच विश्वप्रसर-णाचा काल होय. याला कधीकधी 'हबलचा कॉन्स्टंट' म्हणूनहि संबोधतात. ( कारण प्रथम अमेरिकेच्या हब-लनी त्याचा शोध लावला. ) हा काल सुमार १०,०००,०००,००० वर्षे असल्याचा आढळून येतो.

विश्वाचा प्रसरणकाल ठरविल्यामुळें असा निष्कर्ष निघतो कीं काल अनंत नाहीं. कालाचा अर्थ 'बदल' असा केला तर १०,०००,०००,००० वर्षांपूर्वी कांहींच बदल नव्हता. इसवी सनापूर्वी १०,०००,०००,००० व्या वर्षी एकदम बदलला, म्हणजे प्रसरणाला सुरवात झाली. ( कालाची ही कल्पना मान्य नसेल तर अर्थात् तो अनंत मानतां येईल. ) अशा प्रकारें विश्वाच्या प्रसरणाला निश्चित कालीं सुरवात झाली असेल तर ती सुरवात निश्चित स्थळीं झाली असली पाहिजे. आतां हें निश्चित स्थळ कसें ठरवायचें ?

अशी कल्पना करा कीं विश्वाच्या प्रसरणाचा त्याच्या प्रारंभापासून एक चित्रपट घेतला आहे, आतां हा चित्रपट सुरवातीपासून न दाखवितां शेवटापासून, म्हणजे उलटा दाखविला तर काय दिसेल ? तेजोमेघ एकमेकापासून दूर पळण्याऐवजीं एकमेकाकडे धावत










असल्याचें दिसून येतील. हा चित्रपट तसाच पाठीमागें दाबवत नेला तर ते हळुहळु एकमेकाजवळ येत असलेले, नंतर एकमेकाना चिकटू लागल्याचें व शेवटी एकमेकात दाबले गेल्याचे दिसून येतील. म्हणजे विश्वाच्या प्रसरणाला सुरवात होण्यापूर्वी विश्वांतील सर्व तेजोमेघ एकत्र दाबले गेले होते असें म्हणता येईल. विश्वाच्या प्रसरणाचें कारण आपणाला अशा रीतीनें मिळतें, विश्व प्रसरण कां पावूं लागलें ? कारण तें अगोदर प्रचंड शक्तीने दाबलें गेलें होतें म्हणून होय.

येथें आपण फार सावध राहिलें पाहिजे. कारण असें घडेलच असें नाहीं. बहुतेकानीं असें वर्णन केलें आहे यावरून हें विलोभन किती जबरदस्त आहे याची कल्पना येते. पण ही कल्पना चुकीची असणेंहि तितकेंच संभवनीय आहे, कारण तेजोमेघ एकमेकांत दाबले गेले नसतांनासुद्धां म्हणजे ते एकमेकापासून बऱ्याच अंतरावर असतांनासुद्धां प्रसरण पावूं लागण्याची शक्यता आहे. अर्थात् एकमेकापासून बऱ्याच अंतरावर असलेले हे तेजोमेघ अगोदर स्थिर का होते, व नंतर एकदम ( प्लेग सुरु झाल्याप्रमाणे ! ) आपलें ठिकाण सोडून पळूं का लागले हा प्रश्न निर्माण होतो. आणि या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देतां येत नसल्यामुळेंच वरील 'दाबलेल्या अवस्थे'– ( Squeezed state)चा सिद्धांत मान्य करावा लागतो. पण एखाद्या अवस्थेविषयीच्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं म्हणून तशी अवस्थाच असणार नाहीं असें समजणें बरोबर होणार नाहीं. कदाचित् हे तेजोमेघ आपणाला माहीत नसलेल्या कारणानीं एकदम एकमेकापासून धावूं लागण्याची शक्यता आहे. आपल्या अज्ञानावर आपणाला कोठलाहि सिद्धांत रचतां येणार नाहीं हें उघड आहे. दाबलेल्या अवस्थेची पर्यायी अवस्था असंभवनीय आहे हें निश्चितपणें सिद्ध केलें पाहिजे, तरच दाबलेल्या अवस्थेचा सिद्धांत मान्य करतां येईल. सुदैवाने ही पर्यायी अवस्था असंभवनीय आहे. इतकेंच नव्हे तर दाबलेली अवस्थाच संभवनीय आहे हें सिद्ध करण्यास बळकट पुरावा आहे. उदाहरणार्थ पर्यायी अवस्थेतील तेजोमेघांचें वय हें हबलच्या कॉन्स्टंटपेक्षाहि जास्त असावयास पाहिजे; कारण विश्वप्रसरणाला प्रारंभ होण्यापूर्वी हें तेजोमेघ अस्तित्वात होते. या दृष्टीनें आपल्या आकाशगंगेचें वय १०,०००,०००,००० वर्षांहूनहि अधिक असावयास पाहिजे, पण निरनिराळ्या मार्गानीं ठरविलेलें आपल्या आकाशगंगेचें वय फक्त ६०००,०००,००० वर्षे असल्याचें आढळून येतें. हा पुरावा दाबलेल्या अवस्थेच्या सिद्धांतालाहि बळकटी आणतो. कारण या सिद्धांताप्रमाणें आपल्या आकाशगंगेचें वय हबलच्या कॉन्स्टंटपेक्षा कमी असावयास पाहिजे. कारण या सिद्धांताप्रमाणें दाबलेल्या अवस्थेनंतर हें तेजोमेघ अस्तित्वात आले आहेत. अशा प्रकारें हा एकच पुरावा दाबलेल्या अवस्थेच्या सिद्धांताला बळकटी आणतो, इतकेंच नव्हे तर त्याच्या विरुद्ध असलेला सिद्धांत खोडूनहि काढतो.

पण दाबलेल्या अवस्थेचा सिद्धांत मान्य करण्याचें हेंच एक कारण असतें तर त्याला आपण इतकें महत्त्व दिलें नसतें. या सिद्धांताला बळकटी आणणारा एक स्वतंत्र पुरावा उपलब्ध आहे, तो म्हणजे या सिद्धांताच्या सहायाने विश्वातील मूलतत्त्वांची उपपत्ति लावतां येते. उलट याला विरुद्ध असलेल्या सिद्धांतामध्यें याचीं उपपत्ति लागत नाहीं. शिवाय या अतिसांद्र अवस्थेच्या सिद्धांताला अलीकडील निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानापासूनहि बळकटी मिळाली आहे. ( निरीक्षणात्मक पुराव्याविषयीचा विचार दुसऱ्या लेखांकांत करावयाचा आहे. )

### विश्वाचीं दोन चित्रें

अशाप्रकारें विश्व प्रसरण कां पावत आहे व तें केव्हांपासून असें प्रसरण पावत आहे, या प्रश्नांचीं उत्तरें आपणाला मिळालीं. आतां तें ज्या विशिष्ट वेगाने प्रसरण पावत आहे त्या वेगाची उपपत्ति लावली पाहिजे. ती लावण्यासाठी आपणाला विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेचें स्वरूप समजावून घेतलें पाहिजे. म्हणजेच त्या अवस्थेविषयीचीं समीकरणें आपणांला मांडतां आलीं पाहिजेत. तीं समीकरणें आपल्याला उपलब्ध असलेल्या पुराव्यावरच मांडावीं लागतील. ही अट महत्वाची आहे. कारण विश्व दाबलें गेलें होतें असें म्हणतांना तसें दाबलें जाण्यास काहींतरी कारण घडलें असलें पाहिजे असें समजण्याची आपली प्रवृत्ति असते. पण विश्व प्रसरण पावत आहे या पुराव्याच्या आधारें








तें पूर्वी दाबलें गेलें होतें, एवढाच आपणाला निर्णय काढतां येईल. तें कां व कसें दाबलें गेलें होतें याविषयी निर्णय काढता येत नाहीं. बर्ट्रांड रसेलनी म्हटल्याप्रमाणें, " विश्वाची ही दाबलेली अवस्था म्हणजे विश्वाच्या ज्या सर्वांत प्राचीन काळच्या अवस्थेची आपल्याला माहिती असणें शक्य आहे ती अवस्था होय. " तिच्या पूर्वीची अवस्था केवळ तर्कानेंच ठरवितां येईल. मात्र हल्लीं प्रसरण पावणारें विश्व भविष्यकाळांत आकुंचन पावणार आहे असें दाखवून देतां आलें तर तत्पूर्वीच्या अवस्थेविषयीं आपणाला विधान करतां येईल. कारण भविष्यकाळांत विश्व आकुंचन पावणार आहे असें सिद्ध झालें तर दाबलेली अवस्था अशाच पूर्वीच्या आकुंचनामुळें निर्माण झाली असावी असें अनुमान काढतां येतें. पण असें सिद्ध करतां येतें कां हा प्रश्न आहे. भविष्यांत विश्व विशिष्ट कालानंतर आकुंचन पावणार आहे कीं तसेंच कायमचें प्रसरण पावणार आहे ? हें ठरविणें सोपें असलें तरी त्यासाठीं आवश्यक असलेला पुरावा मिळविणें फार कठीण आहे. हा प्रश्न विश्वांतील वस्तूंच्या सांद्रतेवर अवलंबून आहे. आणि ही सांद्रता ठरवितांना आंतरतेजोमेघीय वस्तूंची सांद्रता विचारात घेतली पाहिजे. ती किती आहे हें निश्चित माहीत नाहीं. ती दुर्लक्षिण्याजोगी आहे असें गृहीत धरून अर्न्स्ट ओपिक यानीं विश्वाची जी सांद्रता काढली आहे ती प्रत्येक घन सेंटीमीटरला २·५×१०^-२९ ग्रॅम इतकी भरते. ही सांद्रता प्रत्येक घ. सें. ला ३·९×१०^-२९ ग्रॅमहून अधिक असेल तरच विश्व आकुंचन पावेल. पण या पेक्षा ती किंचित् कमी आहे, म्हणजे विश्व भविष्यकाळांत आकुंचन पावणार नसून कायमचें प्रसरण पावणार आहे, असें ठरतें. जॉर्ज गॅमो यानीं जी विश्वांतील वस्तूंची सांद्रता गृहीत धरली आहे तीनरूनहि हाच निर्णय निघतो.

अशा प्रकारें विश्व एका प्रारंभिक अतिसांद्र अवस्थेपासून कमी सांद्र अवस्थेकडे उत्क्रांत होत आहे असें म्हणता येईल. विश्वाच्या या कल्पनेनुसार भूतकालांत विश्व एका ठराविक कालीं पूर्णावस्थेंत निर्माण झालें असून तें हलुहलु पण कायमचें अपूर्णावस्थेकडे जात आहे, उष्णताचलन शास्त्राच्या दुसऱ्या नियमाप्रमाणें हा विश्वाचा मृत्यु अपरिहार्य आहे. जास्त तपमानाच्या भागाकडून कमी तपमानाच्या भागाकडे वाहण्याच्या उष्णतेच्या गुणधर्मामुळें विश्वाचें तपमान सारखें होत आहे. विश्व हलुहलु थंड होत आहे. भूतकाळामध्ये एक समय असा होता कीं जेव्हां विश्वाची उत्पत्ति झाली नव्हती; त्यावेळी कालाला अर्थ नव्हता. त्यानंतरच्या ( मध्यंतरीच्या ) काळांत विश्वाची उत्पत्ति झाली असून तें उत्क्रांत पावत आहे. कालाला अर्थ प्राप्त झाला आहे. भविष्यांत असा एक समय येईल कीं जेव्हा विश्वाची ही उत्क्रांति थांबेल. विश्व थंड होईल. आणि पुन्हा कालाला अर्थ उरणार नाहीं.

पण विश्वाचें हें चित्र विश्व कायमचें प्रसरण पावणार आहे या कल्पनेवर आधारलेलें आहे, आणि विश्वाच्या कायमचे प्रसरण पावण्याची ही कल्पना विश्वाच्या सांद्रतेच्या अंदाजावर अवलंबून आहे. ही सांद्रता वर म्हटल्याप्रमाणें आंतरतेजोमेघीय वस्तु दुर्लक्षिण्याजोगी आहे असें समजून ठरविली आहे. पण अलीकडच्या अंदाजाप्रमाणें ही आंतरतेजोमेघीय वस्तु बऱ्याच प्रमाणांत असल्याची आढळून आली आहे. झ्विकी यांच्या अंदाजाप्रमाणें ती पूर्वी समजली जात होती त्याच्यापेक्षा कितितरी पटीने जास्त आहे, हें जर खरें असेल तर वरील दाबलेल्या अवस्थेची आपोआप उपपत्ति लागते, कारण ती अवस्था पूर्वीच्या विश्वाच्या आकुंचनामुळें निर्माण झाली असला पाहिजे.

या नवीन कल्पनेनुसार विश्व आळीपाळीनें आकुंचन व प्रसरण पावत आहे असें म्हणता येईल. आकुंचनानंतर विश्व दाबलें जातें. अशावेळीं विश्वातील सर्व तेजोमेघ एकमेकात दाबले जाऊन नष्ट पावतात. हा विश्वाचा प्रळय म्हणतां येईल. त्यानंतर विश्व प्रसरण पावूं लागतें. तेजोमेघांची उत्पत्ति होते. आणि मग हलुहलु जीवसृष्टि निर्माण होते. ही विश्वाची उत्पत्ति म्हणतां येईल. या कल्पनेनुसार विश्व वरचेवर उत्पन्न होतें व वरचेवर प्रलय पावतें. ही कल्पना विश्वाच्या हिंदु कल्पनेशी बरीच जुळणारी आहे.

पण सुदैवानें विश्वाच्या दाबलेल्या अवस्थेचें स्वरूप समजावून घेण्यासाठीं तिचें दाबलें जाण्याचें कारण

माहीत असण्याची आवश्यकता नाहीं; आणि म्हणून ती पूर्वीच्या विश्वाच्या आकुंचनामुळें निर्माण झाली कीं अन्य कारणानें निर्माण झाली हें ठरविण्याची आपणाला मुळींच गरज नाहीं.

### विश्वाच्या प्रसरणापूर्वी

या अतिसांद्र अवस्थेचें स्वरूप समजावून घेण्यासाठीं अत्यंत प्रचंड दाबाखाली वस्तु कशी वागते याची आपणाला माहिती असावयास पाहिजे. पण प्रयोगशाळेंत ही अवस्था आपल्याला निर्माण करतां येत नाहीं. पण सुदैवानें ज्योतिर्विश्वाच्या प्रयोगशाळेंत आपल्याला तिचें निरीक्षण करतां येईल कारण काहीं ताऱ्यामध्यें नैसर्गिकरीत्याच ती अवस्था निर्माण झाली आहे. (या ताऱ्यांना white dwarfs म्हणतात.) या निरीक्षणावरून अत्यंत प्रचंड दाबाखाली वस्तु वायूप्रमाणे वागते असें आढळून येतें. यावरून असा निष्कर्ष निघतो. कीं **विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेमध्यें वस्तु वायुरूप होती.** हा वायु पृथ्वीवरील वायूप्रमाणें अणूंचा अगर अणुसमूहांचा न बनतां प्रोटॉन, न्यूट्रॉन व इलेक्ट्रॉन या अणूंच्या घटकांचा बनला होता. (Nuclear gas). कारण प्रचंड दाबाखाली नेहमीचे अणु फुटून त्यांचे प्रोटॉन, न्यूट्रॉन व इलेक्ट्रॉन या घटकामध्ये रूपांतर होतें.

भौतशास्त्रांतील नियमाप्रमाणें एकाद्या प्रसरण पावणाऱ्या आकारमानांतील उत्सर्जनाची सांद्रता (Density of radiation) त्याच आकारमानांतील वस्तूच्या सांद्रतेपेक्षा अधिक जलदगतीने कमी होते. उदाहरणार्थ हा आकारमान क्ष³ ने वाढला तर त्यातील वस्तूची सांद्रता तितकीच, म्हणजे क्ष³ ने कमी होईल. पण उत्सर्जनाची सांद्रता क्ष⁴ ने कमी होईल. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेमध्ये प्रत्येक घ. सें. अवकाशात **वस्तूच्या सांद्रतेपेक्षा उत्सर्जनाची सांद्रता अधिक होती.** विश्व प्रसरण पावूं लागलें तसें उत्सर्जनाची सांद्रता अधिक जलद गतीने कमी होऊं लागली व एका निश्चित समयीं ती वस्तूच्या सांद्रतेपेक्षा बरीच कमी झाली. हा काल म्हणजेच वस्तूच्या प्राबल्याचा व उत्सर्जनाच्या अवनतीचा म्हणून विश्वांतील तेजोमेघांच्या निर्मितीच्या काल म्हणतां येईल. कारण जिच्यापासून तेजोमेघ बनले आहेत ती वस्तु आपलें वर्चस्व सिद्ध करूं शकली तरच तिच्यापासून तेजोमेघ निर्माण होतील. जोपर्यंत उत्सर्जनाचें वर्चस्व होतें तोपर्यंत वस्तु (प्रोटॉन, न्यूट्रॉन व इलेक्ट्रॉन) उत्सर्जनामुळे (क्ष-व गामा-किरणामुळे) एकसारखी इतस्ततः फेकली जात होती; आणि म्हणून तेजोमेघ निर्माण करण्यास असमर्थ होती. पण उत्सर्जन कमी होतांच वस्तूची ही इतस्ततः फेकलें जाण्याची क्रिया थांबली व तिचे एकमेकांना चिकटून—म्हणजे गुरुत्वाकर्षणामुळे समूह बनले. म्हणजेच त्यापासून तेजोमेघ व तारे बनले. हें विश्व प्रसरण पावूं लागल्यानंतर १००००००० वर्षांनी घडलें.

आतां हा काल कसा ठरविला ? हा काल ठरविणें या सिद्धांताचें एक महत्त्वाचें अंग आहे. या अतिसांद्र अवस्थेचें भौतिक स्वरूप निश्चित स्वरुपाचें व गणिताने हाताळण्याजोगें होतें हें त्यामुळे सिद्ध होतें. विश्व अतिसांद्र अवस्थेतून तेजोमेघामध्यें रूपांतरित झालें तें एका निश्चित नियमानी होय. हे नियम प्रयोगशाळेंतील ज्ञानावर आधारलेले असले तरी निरीक्षणाने त्यांची कसोटी पहातां येते. या नियमानीं तेजोमेघांची घनता (mass) ठरत असल्याकारणाने निरीक्षणाने आढळून आलेल्या तेजोमेघांच्या घनतेशीं ती ताडून पाहतां येते.

हें साध्य होण्यासाठीं अतिसांद्र अवस्थेचें तपमान व त्या तपमानाला आढळून येणारी वस्तूची सांद्रता हीं माहीत असावीं लागतात. अतिसांद्र अवस्थेचें तपमान ठरविण्यापूर्वी तपमानाचा अर्थ आपण लक्षांत घेतला पाहिजे. कारण आपण व्यवहारांत नेहमी ज्या अर्थानें तपमान हा शब्द वापरतो तो येथें अभिप्रेत नाहीं. या अर्थाचें तपमान वस्तु अणुसमूहांत असेल तरच शक्य आहे. कारण अणूंच्या हालचालीमुळे तें निर्माण होतें. पण जेथे वस्तूतील अणु फुटून त्यांचे घटक वेगळे होतात त्याठिकाणी तपमानाचा अर्थ बदलतो. अशा अवस्थेत उत्सर्जन शक्ति मोठ्या प्रमाणात निर्माण होते. त्यामुळे तपमान हें प्रामुख्याने उत्सर्जनामुळे निर्माण होतें. हे उत्सर्जनाचें तपमान (Radiation temperature) येथें अभिप्रेत असून विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेंत तें किती होतें हें ठरवायचें आहे.

हल्ली तेजोमेघांच्या मधल्या अवकाशांत कांहींच नाहीं असें समजण्याचें कारण नाहीं. तेथें ताऱ्यांचा

प्रकाश आहे. हा प्रकाश उत्सर्जनाचें एक स्वरूपच असून त्यामुळें आंतरतेजोमेघीय अवकाश 'उष्ण' झालेला आहे. अर्थात् ही उष्णता फारच कमी आहे. ती फक्त -१७३° सें. इतकी आहे. या तपमानाला उत्सर्जनाची सरासरी सांद्रता किती असली पाहिजे हें भौतशास्त्रांतील एका सूत्राच्या साहाय्यानें ( याला स्टीफन बोल्झमनचें सूत्र म्हणतात. ) ठरवितां येते. त्याच्या साहाय्यानें ही उत्सर्जनाची सांद्रता प्रत्येक घ. सें. मध्यें १०$^{-२७}$ ग्रॅम इतकी असल्याची आढळून येते. अशा रीतीनें आंतरतेजोमेघीय अवकाशांतील उत्सर्जनाची हल्लीची सांद्रता प्रत्येक घ. सें. ला १०$^{-२७}$ ग्रॅम असेल तर विश्वाच्या प्रसरणाच्या आरंभी ती किती होती हें विश्वाच्या वेगावरून ठरवितां येतें. आणि या सांद्रतेवरून ( वरील सूत्राच्या साहाय्यानें ) त्यावेळचें तपमान मिळतें.

विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेचें तपमान मिळालें तरी त्यावरून त्या काळच्या वस्तूची सांद्रता कळत नाहीं. ती मूलतत्वांच्या निर्मितीशी निगडीत आहे. मूलतत्वांच्या निर्मितीची प्रक्रिया समजावून घेणें अलीकडील अणुविज्ञानांतील प्रगतीमुळें बरेंच सुकर झालें आहे सुदैवानें त्यामुळें प्रसरण पावणाऱ्या विश्वांतील वस्तूची सांद्रता ठरवितां येते. ( हें पुढें अधिक स्पष्ट होईल. ) अशारीतीनें प्रसरण पावणाऱ्या विश्वाचें तपमान आणि वस्तूची सांद्रता मिळाल्यानंतर तेजोमेघ केव्हां बनतील व त्यांची सरासरी घनता किती असेल हें ठरविणें कठीण नाहीं. कारण जेन्स जीन्स यानी दाखवून दिल्याप्रमाणें ही क्रिया न्यूटनच्या नियमानुसार घडून येते. या पद्धतीनें ठरविलेली तेजोमेघांची सैद्धांतिक घनता निरीक्षणानें आढळून येणाऱ्या तेजोमेघांच्या घनतेशीं बरीच जुळत असल्याची आढळून येते. शिवाय वस्तूची सांद्रता कालानुसार कशी बदलते हें माहीत झाल्यामुळें तेजोमेघांच्या निर्मितीचा कालहि ठरवितां येतो. हा काल वर सांगितल्याप्रमाणें विश्व प्रसरण पावू लागल्यानंतर सुमारें १०००००० वर्षें असल्याचा आढळून येतो.

आतां कोणी म्हणेल हा काल ठरविण्याची काय आवश्यकता आहे ? केवळ कालाच्या दृष्टीनें विचार केला तर याची काहींच आवश्यकता नाहीं, पण त्यामुळें एक गोष्ट स्पष्ट होते. ती अशी कीं एका निश्चित समयीं तेजोमेघांच्या निर्मितीला प्रारंभ झाला. हें मुद्दाम स्पष्ट करण्याचें कारण असें कीं प्रसरण पावणारें विश्व तसेंच प्रसरण पावण्याऐवजी तेजोमेघांमध्यें 'घनीभूत' कां व केव्हां झालें, व तें + विशिष्ट वेळींच का झालें ? या प्रश्नांचीं उत्तरें देणें या सिद्धांताला कठीण आहेत असें वाटू नये म्हणून होय. विश्वाच्या प्रारंभ काळीं वस्तुपेक्षां उत्सर्जनाची सांद्रता अधिक होती हें मान्य केल्यास ( आणि भौतशास्त्रांतील व आईन्स्टाईनच्या सापेक्षता सिद्धांतांतील समीकरणावरून हा निष्कर्ष अपरिहार्य आहे. ) कांहीं काळ वस्तु ( प्रोटॉन, न्यूट्रॉन व इलेक्ट्रॉन ) असहाय होती, ( कारण क्ष-व गामा–किरणामुळें अणूंचे घटक एकसारखे फेकले जात होते ) आणि उत्सर्जन सांद्रता वस्तुच्या सांद्रतेहून कमी झाल्यानंतर वस्तु न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसार वागू लागली व तिचें तेजोमेघात रूपांतर झालें, हें ज्याकाळी घडलें तो काळ काहीं आकस्मिकपणें ठरला नाहीं; तर विशिष्ट नियमानुसार निश्चितरूपानें ठरला आहे हा वरील चर्चेचा निष्कर्ष आहे.

## अणूंचा जन्म

वर्णपटदर्शी ( Spectroscope ) व रेडियो दुर्बिण यांच्या साहाय्यानें निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानानें विश्वाच्या घटनेविषयी अलीकडे फारच महत्त्वपूर्ण शोध लावले आहेत. या साधनानीं असें आढळून आलें आहे कीं विश्वांतील मूलतत्वांपैकीं ९९ टक्के हैड्रोजन व हेलीयम हीं हलकीं मूलतत्वें असून ( हैड्रोजनमध्ये १ प्रोटॉन आहे. हेलियममध्यें २ प्रोटॉन व २ न्यूट्रॉन आहेत. ) बाकीची ( फक्त १ टक्का ) जड मूलतत्त्वें आहेत हा महत्त्वाचा शोध आहे. विश्वामध्यें हैड्रोजन इतक्या मोठ्या प्रमाणांत कां असावें हा एक महत्त्वाचा प्रश्न असून त्याचें समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं तर कोणताहि विश्वाविषयीचा सिद्धांत अपूर्ण व असंभवनीय मानावा लागतो. वरील अतिसांद्र अवस्थेचा सिद्धांत याला समाधानकारक उत्तर कितपत देऊं शकतो हें पाहणें अगत्याचें आहे.

आपण वर पाहिलेंच आहे कीं विश्वाच्या प्रारंभीच्या अतिसांद्र अवस्थेंत अणु अस्तित्वात नव्हते – ते

फुटून, प्रोटॉन, न्यूट्रॉने व इलेक्ट्रॉने यामध्यें रूपांतरित झाले होते. प्रसरण पावणाऱ्या विश्वाचें तपमान सुरवातीला कित्येक अब्ज सें. ग्रे. मध्यें होतें. विश्व जसजसें प्रसरण पावूं लागलें तसतसें तपमान कमी होऊं लागलें. आतां सामान्य तपमानामध्यें न्यूट्रॉन फारच अस्थिर असतात. अल्पावधीत त्यांचें प्रोटॉनमध्यें रूपांतर होतें, आणि एक इलेक्ट्रॉन बाहेर फेकला जातो पण अतिसांद्र अवस्थेमध्यें प्रचंड तपमान असल्यामुळें न्यूट्रॉन बऱ्याच प्रमाणांत अस्तित्वात होते. किंबहुना या तपमानांत न्यूट्रॉनचें सतत प्रोटॉनमध्यें व प्रोटॉनचें तितक्याच वेगाने परत न्यूट्रॉनमध्यें रूपांतर होत होतें. पण ही अवस्था फार काळ टिकली नाहीं विश्वाच्या वाढत्या प्रसरणामुळें विश्वाचें तपमान वेगाने कमी होत होतें. तपमानाच्या या उतरतीमुळे प्रोटॉनचें न्यूट्रॉनमध्यें रूपांतर होण्याची क्रिया मंदावू लागली व उपलब्ध न्यूट्रॉनांची संख्या घटूं लागली, पण याचवेळी दुसऱ्या एका क्रियेला चालना मिळाली. ही सामूहिकीकरण क्रिया (aggregation process) होय उच्च तपमानामुळें जे न्यूट्रॉन व प्रोटॉन एकमेकाना चिकटू शकले नव्हते ते आतां एकमेकाना चिकटूं लागले व त्यांची अणूमध्यें रचना होऊं लागली. (अणु हे न्यूट्रॉन व प्रोटॉन यांचे बनले आहेत. त्यांची संख्या साधारणपणें सारखी असली तरी जड मूलतत्त्वामध्यें प्रोटॉनपेक्षा न्यूट्रॉन जास्त आहेत.) पण अणुमध्यें रचना होण्याची क्रिया विश्वाच्या त्या कालच्या वस्तूच्या सांद्रतेवर अवलंबून आहे. वस्तूची (प्रोटॉन, न्यूट्रॉन यांची) सांद्रता फारच उच्च असेल तर सर्व उपलब्ध न्यूट्रॉन मोठे अणु रचण्यामध्यें खर्च होतील. उलट ती कमी असेल तर एकमेकाना आदळण्याची व चिकटण्याची संधी मिळण्यापूर्वीच त्यांचें प्रोटॉनमध्यें रूपांतर होईल व जड अणु अधिक संख्येत निर्माण होणार नाहींत. अशा परिस्थितीत हलके अणु जास्त संख्येत निर्माण होतील. निरीक्षणाने आढळून येणाऱ्या विश्वातील जड व हलक्या मूलतत्वांच्या प्रमाणावरून ही सांद्रता निश्चित कोणती असली पाहिजे हें ठरविता येतें. मागे उल्लेख केल्याप्रमाणें याच पद्धतीनें प्रसरण पावण्यापूर्वीच्या विश्वांतील वस्तूची सांद्रता आपणाला मिळवितां येते.

आतां विश्वात हैड्रोजन व हेलीयम हीं हलकीं मूलतत्त्वें ९९ टक्के आहेत या आढळून आलेल्या वस्तुस्थितीला संख्यात्मक आधार प्रस्तुत सिद्धांतात सापडतो का? या दृष्टीने एन्रिको फर्मी व टर्केविच या शास्त्रज्ञांनीं बऱ्याच विस्ताराने हिशेब केले आहेत. हे हिशेब अर्थातच प्रयोगशाळेत अणुविज्ञानामध्यें झालेल्या संशोधनावर आधारलेले आहेत. (प्रयोगशाळेतील ज्ञान विश्वाच्या उत्पत्तिकालाच्या परिस्थितीला कितपत लागू करतां येईल हा प्रश्न येथे स्वाभाविक आहे. पण विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेतील अणुघटकांची उष्णता-शक्ति हल्लीच्या सायक्लोट्रान व कॉस्मोट्रॉनसारख्या यंत्रातील अणुघटकांच्या गतिशक्ती इतकीच होती असें आढळून येतें. शिवाय विश्वाच्या उत्पत्तिकाली कार्यक्षम असलेले पण हल्ली आपणास माहीत नसलेले असे कांहीं भौतिक घटक त्यावेळी अस्तित्वात असलेच तर ते विचारांत घेतल्याखेरीज विश्वाच्या उत्पत्तीविषयी गणिताने सुसंगत निष्कर्ष काढणें अशक्य होईल. पण असे सुसंगत निष्कर्ष काढणे शक्य आहे यावरून असे घटक अस्तित्वांत असण्याचा संभव फारच कमी आहे हें सिद्ध होतें.) **या हिशेबावरून हैड्रोजन व हेलियम यांचे विश्वांतील जें प्रमाण निघते तें प्रत्यक्षांत आढळून येणाऱ्या प्रमाणाशीं पूर्णपणें जुळतें** असें आढळून आलें आहे.

याशिवाय या शास्त्रज्ञानीं सर्वच मूलतत्त्वांचें प्रमाण सिद्धांताने ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या सिद्धांतानुसार १०० अणुभारापासूनचे पुढील सर्व अणु जास्त प्रमाणात तयार झाले पाहिजेत. आणि प्रत्यक्षांत १०० अणुभारापासूनच पुढील सर्व जड अणु त्यांच्या पूर्वीच्या अणूपेक्षां जास्त प्रमाणांत असल्याचें आढळून येतात. अशारीतीने सिद्धांत आणि निरीक्षण यांच्यामध्ये इतका मेळ बसल्यानंतर तो सिद्धांत बराच संभवनीय आहे असें म्हणतां येईल.

या सिद्धांताच्या सहायाने मूलतत्वांच्या प्रमाणाविषयीच्या इतर काहीं तपशीलांचीहि सुदैवाने उपपत्ति लागते. पण सर्वच गोष्टींची उपपत्ति लागण्यासाठीं हे सिद्धांत अजून बऱ्याच विस्ताराने रचले पाहिजेत. हें काम पूर्ण झालेलें नाहीं.

आतां हे अणु केवढया अवधीत निर्माण झाले? कीं ते अजूनहि निर्माण होत आहेत? अणु निर्माण

होण्यासाठीं न्यूट्रॉन भरपूर संख्येत उपलब्ध असावयास पाहिजेत. पण न्यूट्रान हे सामान्य तपमानांत केवळ १३ मिनिटांतच प्रोटॉनमध्ये रूपांतरित होतात. विश्वातील सर्व मूलतत्वांची योग्य प्रमाणांत निर्मिति होण्यासाठीं न्यूट्रॉन बराच काल अस्तित्वात असावे लागतात. हें अति उच्च तपमानांतच शक्य आहे. पण या तपमानांत न्यूट्रॉन आणि प्रोटॉन हे एकमेकाना चिकटलें पाहिजेत. ही गोष्ट तपमानाची एक निश्चित मर्यादा सुचविते. हें तपमान १ अब्ज सें. ग्रे. च्या आसपास असावयास पाहिजे असें आढळून येतें. आणि हें तपमान सुमारें एक तासभर टिकलें होतें. अशा रीतीनें हल्ली विश्वांत आढळून येणारीं सर्व मूलतत्वें केवळ एका तासांत तयार झालीं आहेत !

पुष्कळांना ही गोष्ट असंभवनीय वाटेल, पण ती तशी मुळींच नाहीं. अणुबाँबचा स्फोट होतो तो केवळ ०.००००००१ सेकंदात होय. आणि एवढ्या अवधीत युरेनियमचा अणु फुटून त्यापासून कित्येक किरणोत्सर्गी धातु तयार होतात. हे धातु बाँबच्या स्फोटानंतर कित्येक वर्षांनीं पृथ्वीवर आढळून येतात. ( आणि अणुबाँबच्या स्फोटाला विरोध करण्याचें हें एक कारण आहे. ) अणुबाँबच्या स्फोटातून केवळ ०.००००००१ सेकंदात तयार झालेले धातु कित्येक वर्षांनी पृथ्वीवर आढळून येतात ही गोष्ट जर आश्चर्यकारक नाहीं, तर अतिसांद्र विश्वाच्या स्फोटातून १ तासात तयार झालेलीं मूलतत्वें कांहीं अब्ज वर्षांनीं आढळून यावींत याविषयी कां आश्चर्य वाटावें ?

अशाप्रकारें 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत विश्वांतील बऱ्याच गोष्टींची समाधानकारक उपपत्ति लावूं शकतो. या सिद्धांतामध्ये गृहीतकृत्यें कोणतींच नसून तो सिद्धांत पूर्णपणें निरीक्षणावर आधारलेला आहे. तरीसुद्धां तो सिद्धांत चुकीचा असण्याची शक्यता आहे. हें अर्थात् निरीक्षणाने ठरविलें पाहिजे. निरीक्षणात्मक पुराव्याविषयीचा विचार दुसऱ्या लेखांकात करावयाचा आहे. येथे एवढेंच लक्षात ठेवलें पाहिजे कीं विश्वाची उत्पत्ति 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत वर्णन करतो त्याच एका रीतीने घडून येईल असे नाहीं. ती निराळ्या रीतीनेसुद्धा घडून येण्याची शक्यता आहे. ही रीति वर्णन करणारा दुसरा एक सिद्धांत असून त्याचा विचार दुसऱ्या लेखांत करावयाचा आहे.











अनुक्रमणिका



आपण निर्धास्त
राहूं शकतां
ज्या वेळीं
आपण आपला माल..
द्वारा पाठवितां






तो तेथें वेळेवर
पोहोंचण्याची आपण
खात्री बाळगुं शकतां




मध्य रेल्वे



# नवी सवलत

राष्ट्रीय बचत सर्टिफिकिटे, राष्ट्रीय योजना सर्टिफिकिटे, ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट सर्टिफिकिटे, किंवा ॲन्युइटी सर्टिफिकिटे धारण करणाऱ्यांना आणि ज्यांचें पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँकेंत किंवा संचित मुदतीच्या ठेवींच्या योजनेचे खाते असेल अशा इसमांना आतां आपला मृत्यू झाल्यास आपल्या सर्टिफिकिटांची अथवा खात्यांतील रक्कम कोणास मिळावी तें ठरवून देतां येतें. त्यासाठीं त्यांना एका अथवा अनेक व्यक्तींची नियुक्ति करता येते.
ज्या इसमाची अथवा इसमांची अशा रीतीनें नियुक्ति झाली असेल त्यांना वारसाबाबतचा कायदेशीर पुरावा सादर करावा न लागतां मृत इसमाची रक्कम मिळूं शकते. या बाबत इतर कोणत्याहि इसमाचा हक्क राहात नाहीं. यासंबंधीचे नवे नियम १ ऑगस्ट १९६० पासून अंमलांत आले आहेत.

★ वैयक्तिकरित्या सर्टिफिकिटे धारण करणाऱ्यांना आणि वैयक्तिक खातेदारांनाच फक्त ही सवलत मिळते.

★ एकदां नियुक्ति केल्यानंतर ती रद्द करावयाची असेल अथवा त्यांत कांहीं बदल करावयाचा असेल तर संबंधित पोस्ट ऑफिसांत ठराविक फॉर्मवर अर्ज करून तसें करता येते.

★ अधिक माहितीसाठीं नजिकच्या पोस्ट ऑफिसांत चौकशी करा.

# अल्पबचत योजना

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई